सवे परक्रमन्तु सवलोकहिताय । सम्राट् अशोक

ASHOKA'S EXHORTATIONS TO SOCIETY

अशोकाचा राजधर्म । पाळा तुम्ही सर्वजण ।
तेणें व्हाल जगीं वन्द्य । पुण्यवंत सुखी सदा ।।

महाराष्ट्र राज्याच्या समाजकल्याण, शिक्षण, शेतकी, तुरुंग, खात्यांनीं पुरस्कारिलेलें.

# अशोकाचा राजधर्म

[ सारनाथ स्तंभ शिरोभाग ]

लेखक—नारायण वासुदेव तुंगार, काव्यतीर्थ, पालीतीर्थ ( कलकत्ता ), साहित्यभूषण, माजी संस्कृत व पाली प्राध्यापक, एक्स्टर्नल नाईट कॉलेज, नानावाडा, पुणें

दुसरी आवृत्ति
१९६१

किंमत ७५ नवे पैसे

## निवेदन

भारत सरकारनें सम्राट् अशोकाचें चिन्ह राज्यचिन्ह म्हणून धारण केलें आहे. अशोक राजानें पाली भाषेंतील चौदा शिलालेखांवर प्रजेला उद्देशून कर्तव्यें, नीति, सदाचार-रूपी धर्माचा उपदेश केला आहे. त्याचें ज्ञान मराठी जाणणाऱ्या आबालवृद्धांना व्हावें व त्यांनीं तसें आचरण करावें हें ध्येय डोळ्यापुढें ठेवून मी हा " अशोकाचा राजधर्म " वाचकांना सादर करीत आहे. याच विषयावर मराठी शाळा, हायस्कुलें, कॉलेजें व सार्वजनिक संस्था, येथें एकूण १०८ व्याख्यानें मोफत देण्याचा ( म्हणजेच ज्ञानमय यज्ञ करण्याचा ) संकल्प मी केला आहे. पैकीं आतांपर्यंत खेडीं व शहरें यांतून मी ६० व्याख्यानें दिलीं आहेत—ज्ञानयज्ञ केला आहे. सवाक् विसर्गः जनताघ विप्लवः ( शुकाचार्य—महाभारत ). जें जनतेच्या ठिकाणीं असलेल्या पापवृत्तींचा नाश करण्यास कारणीभूत होतें तें वाङ्मय होय. या व्याख्येच्या कसोटीला " अशोक राजानें प्रजेला सांगितलेला धर्म " उतरत आहे यांत शंका नाहीं. जनता सुखी व्हावी, पापभीरू व्हावी, सदाचारी बनावी, आणि एकमेकांशीं गुण्यागोविंदानें वागणारी असावी, हाच अशोकाचा हेतु होता. त्याचेंच अनुकरण व तसा प्रयत्न भारत सरकार, प्रांतीय सरकार व जनता करीत आहे. त्याला पोषक असे अनेकांचे अनेक प्रयत्न होणें आवश्यक आहे. हें जाणून मी हें पुस्तक प्रसिद्ध करीत आहे.

प्रजासत्ताक दिन }
२६-१-१९५८ }

**ना. वा. तुंगार**

## दुसऱ्या आवृत्तीचें निवेदन

द्रव्यमय यज्ञापेक्षां ज्ञानमय यज्ञ कल्याणकारक या भगवान् श्रीकृष्णाच्या गीतेंतील उपदेशाप्रमाणें मी सन १९५८, १९५९ या दोन वर्षांत मुंबई प्रांतांतील प्राथमिक शाळा, हायस्कुलें, कॉलेजें, सार्वजनिक संस्था, उत्सव

यात्रा, येथें स्वखर्चानें जाऊन "अशोकाचा राजधर्म" यावर निःशुल्क १०८ व्याख्यानें दिली. या व्याख्यानरूपी यज्ञाचा समाप्तिसमारंभ दिनांक २४-४-५९ रोजीं पुणें गोखले हॉलमध्यें संध्याकाळीं ५ वाजतां नामदार हरिभाऊ पाटसकर, गव्हर्नर मध्यप्रदेश, भोपाळ, यांचे अध्यक्षतेखालीं साजरा केला. या वेळीं महामहोपाध्याय प्रा. द. वा. पोतदार, माजी आमदार पोपटलाल शहा, प्रि. ज्ञा. तु. देशपांडे, प्रा. गुं. दा. कंपली, प्रा. करोडे, यांची या व्याख्यान-सेवेबद्दल भाषणें झालीं. या वेळीं १००८ व्याख्यानें देण्याचा मी संकल्प केला. पैकीं ८० व्याख्यानें झालीं.

१२ जुलै १९६१ — **ना. वा. तुंगार**

## अ नु क्र म णि का

# अशोकाचा राजधर्म

**ॐ भारतमात्रे नमः । ॐ राष्ट्रपुरुषेभ्यो नमः ।**

## स्वातंत्र्यवीरांनीं स्वराज्य मिळविलें

हिंदुस्थानाला पारतंत्र्यांतून मुक्त करण्यासाठीं सन १८५७ सालीं श्रीमंत **नानासाहेब पेशवे**, सेनापति **तात्या टोपे**, झांशीची महाराणी **लक्ष्मीबाई** या महान् स्वातंत्र्यवीरांनीं इंग्रजांविरुद्ध लढा चालू केला. त्यांत सेनापति तात्या टोपे यांना फांशी जावें लागलें व महाराणी लक्ष्मीबाई यांना युद्धांत वीरमरण आलें. भारत सरकारनें या स्वातंत्र्यसंग्रामाचा शंभरावा महोत्सव १६ ऑगस्ट १९५७ रोजीं साजरा करून पेशवे, टोपे, लक्ष्मीबाई या तीन आद्य स्वातंत्र्यवीरांचा व महान् देशभक्तांचा कृतज्ञतापूर्वक फार मोठा गौरव केला आहे. स्वातंत्र्यलढ्याची तीच परंपरा लाला हरदयाळ, मदनलाल धिंग्रा, कान्हेरे, चाफेकर, स्वातंत्र्यवीर सावरकर, श्यामजी कृष्णवर्मा वगैरे अनेक क्रांतिकारक देशभक्तांनीं पुढें चालू केली. त्यांत अनेक क्रांतिकारक देशभक्तांना फांशी जावें लागलें आणि अनेकांना अंदमानाची काळ्या पाण्याची शिक्षा भोगावी लागली. या त्यांच्या स्वातंत्र्यचळवळीमुळें त्यांच्या नातेवाइकांना इंग्रजांनीं पूर्वीं खूप त्रास दिला. त्यामुळें बहुजनसमाजाला पारतंत्र्यांतील दुःख व स्वातंत्र्याचें सौख्य यांची पूर्ण जाणीव झाली.

त्यानंतर हिंदमातेला स्वतंत्र करणाऱ्यांत "स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे" ही घोषणा प्रथम करणारे आणि त्यासाठीं तुरुंगवास व खूप हाल सोसणारे त्या वेळचे काँग्रेसचे पुढारी लोकमान्य बाळ गंगाधर **टिळक** यांनीं जनतेंत स्वातंत्र्यस्फूर्ति निर्माण केली.

## महात्मा गांधीजींचा मंत्र

**महात्मा गांधी**—इंग्रज येथें आले ते येथें रहाण्यासाठीं आले नाहींत, तर या देशांतून स्वतःला फायदा मिळविण्यासाठीं आले होते. येथील जनतेवर ते प्रेम करूं शकले नाहींत; फक्त त्यांनीं जनतेला आपलें ग्राहक बनवून फायदा करून घेतला. त्यामुळें येथील दुर्बल, भुकेनें मेले.

मंत्र १–इंग्रजांची भीति सोडून आम्हाला स्वराज्य पाहिजे हा मंत्र घोका. मंत्र २–आपसांत भांडण नको, पूर्वीपासून एक होतों, व आजही एक आहोंत हें सिद्ध करा. ही एकता आपल्या हिंदुस्थानची ताकत होईल. निर्भयता, एकता, स्वराज्याची तीव्र इच्छा, ही तयारी जेव्हां समाजाची झाली, तेव्हां ते इंग्रजांना "चले जाव" म्हणाले. जेव्हां आपण बलवानाला भिणार नाहीं आणि अशक्ताला भिवविणार नाहीं तेव्हां आपण निर्भय बनूं. सन १९४२ सालीं इंग्रजांना उद्देशून "चले जाव" घोषणा करणारे कॉंग्रेसचे मुख्य व अहिंसावादी महात्मा **गांधी** व त्यांच्या चळवळींत भाग घेणारे सुभाषचंद्र बोस, सरदार पटेल, सरोजिनी नायडू वगैरे दिवंगत अनेक देशभक्त व पंडित **जवाहरलाल नेहरू** वगैरे विद्यमान, लहान-थोर, प्रसिद्ध-अप्रसिद्ध, अशा हजारो देशभक्तांच्या त्यागानें तपश्चर्येनें आणि चळवळीनें तसेंच बहुजन-समाजाच्या पाठिंब्यानें व जागतिक युद्धाच्या परिस्थितीनें दिनांक १५ ऑगस्ट १९४७ या मंगल दिवशीं आपल्या हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळालें. ह्या मंगल दिवसापासून जनतेनें जनतेच्या हितासाठीं दिल्लीच्या लोकसभेवर व राज्यसभेवर निवडून दिलेल्या मंत्र्यांनीं, खासदारांनीं, त्याचप्रमाणें त्या त्या प्रांतांच्या मंत्र्यांनीं व आमदारांनीं हिंदुस्थानचा राज्यकारभार हातीं घेतला.

## भारतानें अशोकचक्र राजचिन्ह म्हणून स्वीकारिलें

या स्वातंत्र्यदिवसापासून हिंदुस्थान सरकारनें आपल्या राष्ट्रध्वजावर (निशाणावर), नाण्यांवर, नोटांवर, पोस्टाच्या पत्रांवर, तिकिटांवर आणि पाकिटांवर, सम्राट् अशोकाचें राज्यचिन्ह धारण केलें आहे. भगवान् गौतम बुद्धांनीं निर्वाणप्राप्तीच्या मार्गाचें स्पष्टीकरण करणारें आपलें पहिलें प्रवचन बनारसजवळील सारनाथ येथें केलें. तेथें उभारलेला अशोकस्तंभ हें भारताचें राज्यचिन्ह आहे. मूळ स्तंभावर चार सिंह पाठीला पाठ भिडवून उभे असलेले, असे एका चौथऱ्यावर दाखविलेले आहेत. चौथऱ्याच्या मध्यभागीं धर्मचक्र असून उजव्या बाजूला शेतकऱ्याचें चिन्ह बैलाची आकृति आहे; व डाव्या बाजूला सैनिकाचें चिन्ह हत्तीची व घोड्याची आकृति आहे. **मुंडकोपनिषदांतील 'सत्यमेव जयते।'** सत्याचाच अखेर विजय होतो, हें देवनागरी लिपींत लिहिलेलें ध्येयवाक्य त्या प्रतीकाखालीं घालण्यांत आलें आहे.

## धर्मचक्राचें स्वरूप

चार सिंह पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर, या चार दिशांकडे **मानवता** धर्माची गर्जना करीत आहेत. “ **माणसानें माणसाशीं माणुसकीनें वागावें** ” या मानवता धर्माची जणूं काय सिंह गर्जना करीत आहेत. धर्मचक्र चोवीस आऱ्यांचें आहे. **शुद्ध आचरणाचे नियम** हे आरे होत. **समता**, आऱ्यांचा सारखेपणा होय. **सद्बुद्धि** चाकाची धांव होय. **विनय** आणि **शील** हीं आऱ्यांची नाभि (तुंबा) होय. नैतिक एकीकरणाचें प्रतीक असें हें धर्मचक्र आहे.

## सम्राट् अशोकाची थोरवी

सम्राट् **अशोक** हा मौर्य घराण्याचा संस्थापक **चंद्रगुप्त** याचा नातू (मुलाचा मुलगा) होय. ख्रिस्तपूर्व २७३ सालीं तो राज्यावर आला. अशोकाच्या वडिलांचें नांव बिंदुसार, आईचें नांव सुभद्रांगी, पत्नीचें नांव तिष्यरक्षिता, मुलाचें नांव महेंद्र व मुलीचें नांव संघमित्रा. अशोकाच्या वंशावळीचें वर्णन संस्कृत भाषेंतील विष्णुपुराणांत आहे, जैनांच्या स्थविरावलि, नांवाच्या ग्रंथांत आहे व बौद्धांच्या पालीभाषेंतील **महावंस** या ग्रंथांत आहे. हिंदुस्थानांत धर्मराज, विक्रमादित्य, हर्ष, अकबर, शिवाजी वगैरे अनेक राजे होऊन गेले; त्यांत सर्व दृष्टींनीं अशोकाची कारकीर्द उत्तम झाली अशी सर्वजण मुक्तकंठानें स्तुति करतात--(१) **स्वामी विवेकानंद**-खंड १०, पान ५१. राजांनीं अंतःपुरांत काळ घालवून सर्व आयुष्य शिकारींत आणि सुखोपभोगांत घालवावें हाच त्यांचा नित्यक्रम. शेंकडों दुष्कृत्यें करणारे चंडाशोक आपणांस हवे तितके आढळतात, पण धर्माशोक मात्र एखादाच असतो. नेहमीं लोकांचें रक्त शोषून आपलें वर्चस्व वाढविणारे हजारो अवरंगजेब असतात. परंतु लोकजीवन हाच स्वजीवनाचा हेतु करणारा अकबर एखादाच असतो. अशोकासारखे दैवी स्वभावाचे राजे लाभल्यानें जनतेचें जीवित व वित्त सुरक्षित होतें. (२) **सुप्रसिद्ध इतिहासलेखक, एच्. जी. वेल्स्** हे आपल्या “इतिहासाची रूपरेषा” या ग्रंथांत म्हणतात, “इतिहासाच्या रकान्यारकान्यांनून गर्दी करून सोडणाऱ्या ह्या शेकडों राजेमहाराजांच्या नांवांत राजा अशोकाचें एकमेव नांव ताऱ्याप्रमाणें चमकत असलेलें

दिसतें. व्होल्गा नदीपासून ( रशियांतील महानदी ) ते थेट जपानपर्यंत अशोकाच्या नांवाबद्दल लोकांना अजून आदर आहे. चीन, तिबेट व हिंदुस्थान ह्या देशांत अशोकाची आठवण अजून कायम आहे.

## सम्राट् अशोकाचें भेदभावरहित राज्य होतें. त्याचेंच अनुकरण ारत सरकार करीत आहे.

सम्राट् अशोकाचें " भेदभावरहित राज्य होतें " याचें कारण अशोक हा भगवान् गौतम बुद्धाचा अनुयायी होता व त्यानें बौद्ध धर्म पत्करलेला होता. " विषमतेच्या जा " समता यावी, जातिभेदाच्या जागीं गुणांनीं श्रेष्ठपणा यावा, सर्व मानव समाज सत्त्वगुणसंपन्न बनावा, आपल्या राज्यांतील कोणत्याही धर्माच्या लोकांना पक्षपात, भेदभाव, द्वेषभाव, उच्च-नीचभाव, वाईट वागणूक, यांचा उपद्रव होऊं नये, सर्वांनीं एकमेकांशीं गुण्यागोविंदानें, प्रेमानें, दयाबुद्धीनें व आपुलकीच्या भावनेनें वागलें पाहिजे. आपण नेहमीं जसें सुखी असलें पाहिजे, तसें दुसऱ्यानेंही सुखी असलें पाहिजे. " हा जो बुद्धाचा उत्कृष्ट उपदेश होता, त्याचें आचरण अशोकानें स्वत: केलें व आपले नोकर व आपली प्रजा यांनाही भेदभाव-रहित वागण्याचा संदेश दिला, त्याप्रमाणें सर्वजग वागूं लागले व आनंदी आणि सुखी झाले. आज आपल्या भारत सरकारनेंही " **भेदभावरहित राज्य** " चालविलें आहे. कांहीं लोक भारताच्या राज्याला उद्देशून निधर्मी राज्य हा शब्दप्रयोग वापरतात, परंतु तो चुकीचा आहे. त्याचे जागीं पक्षपातरहित किंवा भेदभावरहित राज्य, असा शब्दप्रयोग योग्य आहे. आपल्या भारतांत कोणत्याही धर्माचा किंवा कोणत्याही जातीचा समाज असो त्याला न्यायनिवाडा, संरक्षण, शिक्षण वगैरे भारतीय प्रजेला मिळणाऱ्या सर्व आवश्यक गोष्टी राज्यकर्त्यांकडून मिळतील; त्या बाबतींत भेदभाव किंवा जातिभेद, विषमता, पक्षपात होणार नाहीं, सर्व समाजाशीं ऐक्यभाव, समता, हीच वागणूक नेहमीं राहील, हें भारत सरकारचें अनुकरणीय व स्तुत्य धोरण आहे.

## भारतीय बौद्धधर्माची तेजस्विता

हिंदी राष्ट्रांत जन्मलेले जे धर्म ते हिंदी धर्म होत. वैदिक ऋषिमुनींनीं जतन केलेला वैदिक धर्म, जैनांच्या तीर्थंकरांनीं संरक्षण केलेला जैन धर्म आणि

बुद्धाच्या अनुयायांनीं रक्षिलेला बौद्ध धर्म आणि नानकानें स्थापिलेला शीख धर्म, हे सर्व धर्म व त्या धर्मांचे आद्य संस्थापक व भक्त लोक, हिंदी राष्ट्रांतच जन्मले आणि त्यांनीं आपआपल्या धर्माचा प्रचार प्रथम हिंदी राष्ट्रांतच केला, म्हणून वैदिक धर्म, जैन धर्म, बौद्ध धर्म आणि शीख धर्म, यांचा समावेश हिंदी धर्मांतच होतो. **भारतीय संस्कृति** म्हणून जी जगांत प्रसिद्ध संस्कृति आहे त्या संस्कृतींत वैदिक संस्कृति, जैन संस्कृति, बौद्ध संस्कृति व शीख संस्कृति, यांचा समावेश होतो. **संस्कृति** म्हणजे सम्यक् कृति–चांगली कृति, असा अर्थ आहे. मानव समाजाच्या सर्वांगीण उन्नतीसाठीं समाजानें नेहमीं चांगली कृति कशी करावी व मानव समाजानें नेहमीं या जगांत "आनंदमय, सुखमय, दुःखरहित असावें, पापरहित असावें आणि शुद्ध कर्से असावें" हाच उपदेश वरील संस्कृतींनीं कमी-अधिक प्रमाणांत केला आहे. भगवान् बुद्धाला वैदिक लोक अवतार मानतात. रोजच्या पूजेच्या संकल्पांत "**बौद्धावतारे**" असा उल्लेख करतात. मूळ पाली भार्षेतील बौद्ध धर्म व त्यांतील विचारसौंदर्य जाणून न घेतां, बौद्ध धर्माबद्दल निष्कारण द्वेषबुद्धि, संकुचितबुद्धि व भेदबुद्धि ठेवणारे कांहीं मूठभर अडाणी, जातीयवादी पक्षांध, असे कांहीं हिंदु लोक आहेत. ते लोक सोडल्यास, वैदिक धर्माचे आणि भारतीय संस्कृतीचे जगप्रसिद्ध कट्टे पुरस्कर्ते व प्रचारक **स्वामी विवेकानंद** हे बुद्ध व बौद्ध धर्म यांची स्तुतीच करतात असें आपणांस दिसेल. हा विचार केला म्हणजे जे लोक बुद्धनिंदा करतात ते संत तुकाराम महाराजांच्या मतें—

**संतनिंदा आवडे ज्यासी । तो जिताची नर्कवासी ।**
**तुका म्हणे तो नष्ट । जाणा गाढव तो स्पष्ट ।।**

अभंग २९३६

या वर्णनाला पात्र ठरतात.

## विवेकानंदकृत बुद्धस्तुति

**विवेकानंद ग्रंथ**- १ भगवान् गौतम बुद्धानें स्थापिलेला बौद्ध धर्म वैदिक धर्म यांबद्दल अनेक चुकीचे समज आहेत. बौद्ध धर्म हा वैदिक धर्माची एक शाखा आहे. २ मीपणा किंवा अहंकार ज्यांच्यांतून पूर्ण नाहिंसा झाला असे पुरुष भगवान् बुद्ध हेच होत. बुद्धाच्या अंतःकरणाचा

एकलक्षांशही जर मला मिळेल, तर मी स्वतःस धन्य समजेन. निःसीम भक्तीनें, योगानें व ज्ञानानें जी पूर्णावस्था प्राप्त होते तीच पूर्णावस्था बुद्धानें मिळविली होती.

**विवेकानंद ग्रंथ, खंड ८, पान २०७:**—जगाचें कल्याण व्हावें एवढ्याकरितां गौमत बुद्धाचा जन्म झाला असें कोणी म्हटलें आहे तें अगदीं बरोबर आहे. स्वतःची मुक्ति साधावी म्हणून अरण्यांत जाऊन तो ध्यानस्थ बसला नाहीं. सर्व जग दुःखाग्नीनें होरपळून गेलें आहे असें पाहून, त्या अग्नीच्या उपशमाची तरतूद त्यानें चालविली. या जगांत इतकें दुःख कां भरलें आहे या एकाच प्रश्नाच्या उत्तरासाठीं सारा जन्म तो धडपड करीत होता. आपली नीतिमत्ता बुद्धाच्या इतकी उज्ज्वल आहे असें तुम्हांस वाटतें काय?

**विवेकानंद ग्रंथ, खंड ७, पान १८३:**—अद्वैत शास्त्राचा प्रसार अगदीं खालच्या वर्गापर्यंत केव्हांही झालेला नाहीं. हें मत कांहीं ऋषींनीं प्रथम स्थापित केलें आणि ते ऋषी अरण्यांत जाऊन राहिले. याकरितांच त्याला आरण्यक ही संज्ञा मिळाली. परमेश्वराच्या कृपेनें बुद्ध अवतरला आणि हेंच मत त्यानें खालच्या वर्गापर्यंत पोहोंचविलें; त्या वेळीं सारें राष्ट्र बौद्ध झालें. बुद्धावतारापूर्वी हिंदुस्थान देश जडवादांत अगदीं बुडून गेला होता. चैन करणें हीच नीति, ऋण काढून सण करणें हा धर्म या तत्त्वज्ञानाचा प्रसार खूप झाला होता. बुद्धदेवानें वेदान्तधर्म पुनः प्रकाशांत आणला. अगदीं खालच्या वर्गापर्यंत त्याचा प्रसार करून त्यानें भरतभूमीचें रक्षण केलें. बुद्धदेवाचा सारा भर तत्त्वज्ञानांतील नीतिशास्त्र शिकविण्याकडे होता.

**विवेकानंद ग्रंथ, खंड ७, पान १८५:**—बुद्धदेवाच्या ठिकाणीं अंतःकरणाचें विशालत्व दृष्टीस पडतें. त्याचें अंतःकरण विश्वरूप होऊन गेलें होतें. धर्माचें व्यवहार्य रूप काय आहे, हें स्वतःच्या आचरणानें दाखवून त्यानें तें सर्वांच्या आटोक्यांत आणून दिलें. बुद्धदेवाचें उदार अंतःकरण आणि श्रीशंकराचार्यांचें बुद्धितेज या दोन गोष्टींचें एकत्र रूप आज आपणांस हवें आहे. असा अभूतपूर्व संयोग घडून आला तर त्यांतून जगानें पूर्वी न पाहिलेलें अत्युच्च तत्त्वज्ञान निर्माण होईल.

**राष्ट्रगुरु लोकमान्य बाळ गंगाधर टिळक:**-गीतारहस्य-पान ५६६. बौद्धधर्म हा वैदिक धर्मरूप आपल्या पित्यापासून आपल्याला पाहिजे तेवढ्या संपत्तीचा वांटा घेऊन कांहीं कारणासाठीं वेगळा निघालेला मुलगा आहे. अर्थात् तो परका नसून तत्पूर्वी ब्राह्मणधर्माची येथेंच उत्पन्न झालेली शाखा आहे.

**राष्ट्रपिते महात्मा गांधी :**— [ ता. २७-११-१९२७, कोलंबो येथील अखिल बौद्ध महासभेच्या भाषणांत ] (१) बुद्धाच्या उपदेशाचा महत्त्वाचा भाग हिंदु धर्मांत मिसळून जाऊन त्याचें अंगच बनून गेला आहे. आपल्या महान् आत्मयज्ञानें, भव्य त्यागानें आणि जीवनाच्या निष्कलंक पावित्र्यानें बुद्ध हे हिंदु धर्मावर कधीं पुसतां येणार नाहीं अशी छाप ठेवून गेले आहेत. हिंदु धर्म या महान् गुरूचा कायमचा ऋणी आहे. गौतम बुद्ध हिंदु होते, हिंदुश्रेष्ठ होते. हिंदुधर्माच्या उत्तमांशानें ते न्हाले होते. (२) ईश्वरानें निर्माण केलेल्या पशूचें ताजें रक्त ईश्वराला आवडतें, त्यानें ईश्वर प्रसन्न होतो या खोट्या समजुतीविरुद्ध बुद्धाचा सारा अंतरात्मा सात्त्विक संतापानें बंड करून राहात असे. (३) **या विश्वाचें साम्राज्य नीतिनियमांच्या आधारानें चालतें आणि हे नीतिनियम शाश्वत आणि अटळ आहेत, यावरच बुद्धानें विशेष भर दिला आहे.**

**आचार्य, श्रेष्ठ संत, व दान या श्रेष्ठ तत्त्वाचे पुरस्कर्ते, विनोबाजी भावे :**-(भूदानयज्ञ, २४ मे १९५६)--संसारदुःखाचें कारण "जीवनतृष्णा" असून मी व माझें याविषयींच्या मिथ्या ज्ञानांत या तृष्णेचा उगम आहे. हें मिथ्या ज्ञान नष्ट करून जीवनतृष्णेचें मूळच उखडून टाकणें म्हणजे दुःखाचा विनाश करणें होय. हें अंतर्ज्ञान प्राप्त करून घेऊन बोधिसत्त्व अंतीं बुद्ध झाले. **भारताच्या भूमीवर भगवान् बुद्धाच्या चरणखुणा उमटलेल्या आहेत आणि आज मी त्याच्याच मार्गानें व त्यांच्याच पद्धतीनें जात आहे. बुद्धांनीं जें धर्मचक्र-प्रवर्तनाचें काम सुरू केलें होतें तेंच काम पुढें नेण्याचा मी प्रयत्न करीत आहे.** अडीच हजार वर्षांपूर्वी बुद्ध या भूमींत शरीरानें होते; परंतु बुद्धाचें शरीर जरी आज नसलें, तरी त्यांचें अवतारकार्य मात्र

चालूच आहे. " **वैरानें वैर कधींही शमवितां येणार नाहीं** " या विचाराचें या देशांतील प्रेरणास्थान म्हणजे भगवान् बुद्ध होय. गेलीं अडीच हजार वर्षे हा विचार आपल्याला प्रेरणा देत आहे.

**आचार्य भागवत :**–( मे १९५६) मुंबईच्या रुइया कॉलेजच्या पटांगणांत "संत आणि त्यांची जीवनदृष्टि" या विषयावरील प्रवचनांत म्हणाले —पहिला संतपुरुष बुद्ध होय. १. प्राचीन काळापासून आतांपर्यंत माणसापुढें ज्ञान श्रेष्ठ कीं प्रेम श्रेष्ठ, माणूस डोक्यानें मोठा होतो कीं अंतःकरणानें मोठा होतो हा प्रश्न आहे. बुद्धानें हा प्रश्न जोरानें मांडून, **माणूस हा अंतःकरणानें व कारुण्यानें मोठा होतो** हें उत्तर दिलें. २ बुद्धकाळीं स्त्री-शूद्रांना तुच्छ लेखून, त्यांना सर्व ज्ञानापासून व सुखापासून दूर ठेवण्यांत आलें होतें. हें पाहून बुद्धाला फार वाईट वाटलें. बुद्धाचें लक्ष जगांतल्या या दुःखाकडे वेधलें. सुंदर पत्नी व वैभव यांचा त्याग करून **मानवसेवेसाठीं बुद्ध राजवाड्याबाहेर पडला.** लोकांच्या सेवेसाठीं लोकांत मिसळला व लोकसेवेंत रममाण झाला. करुणा करणें हा संदेश बुद्धानें जगाला दिला, म्हणून वैदिक धर्मानें टाकलेले लक्षावधि लोक बुद्धाभोंवतीं जमा झाले. गौतम बुद्ध हा पहिला संत आहे, संतपरंपरेची तो गंगोत्री आहे.

**डॉ. बाबासाहेब आंबेडकर**— १. माझा बौद्धधर्माकडेच निश्चित कल आहे. बौद्ध धर्माचीं तत्त्वेंच चिरंतन व समतावादी आहेत. मीं बौद्धांचीं तत्त्वें आचरून, माझ्या बांधवांनाही तीं तत्त्वें आचरण्याचा आदेश दिला आहे. २. बुद्धिवाद, शील व तर्कशुद्धता हे बौद्धधर्माचे विशेष गुण आहेत. त्यामुळें बौद्धधर्मास मला हिरवीगार असलेल्या निसर्गसंपन्न दरीची उपमा द्यावीशी वाटते. ३ जगांतील सर्व धर्मांचा मी खूप अभ्यास केला आणि शेवटीं हा निर्णय घेतला कीं, बौद्धधर्माशिवाय अस्पृश्यांना दुसरा कोणताही मुक्तीचा मार्ग नाहीं. फक्त बौद्धधर्मांतच अस्पृश्यतेच्या निवारणाचा चिरकालीन उपाय आहे. जर तुम्हाला समतेचें तत्त्व हवें असेल आणि आर्थिक दास्यांतून मुक्तता करावयाची असेल तर बौद्धधर्माशिवाय कोठेंच दुसरा आश्रय नाहीं. [ कोलंबो–१९५०. जागतिक बौद्धधर्मपरिषदेंत बुद्धजयंतीनिमित्त भाषण. ]

## भगवान् बुध्दाची तळमळ

भगवान् बुद्धानें एके ठिकाणीं असे उद्गार काढिले कीं, थोड्या पाण्यांत तडफडणाऱ्या माशांच्या प्रमाणें एकमेकांशीं विरोध करून तडफड-णाऱ्या लोकांना पाहून यांचें शेवटीं काय होणार ? यामुळें माझ्या मनांत भय शिरलें.

फन्दमानं पजं दिस्वा, मच्छे अप्पोदके यथा ।
अञ्ञमञ्ञेहि व्यारुद्धे दिस्वा मं भयमाविसि ॥

**पाली–सुत्तनिपात–अत्तदंडसूत्र ५३, गाथा २**

हे उद्गार काढण्याचीं कारणें पुढीलप्रमाणें आहेत:—

**बुध्दकालीन भारतीय समाज हिंसामय यज्ञांत गुरफटून गेला होता:**—भगवान् गौतम बुध्दाच्या वेळीं राजे रजवाडे ब्राह्मणांच्याद्वारें चातुर्मास्य, अग्निष्टोम, वाजपेय, राजसूय, अश्वमेध आणि पुरुषमेध वगैरे लहान-मोठे यज्ञयाग करण्यांत गुंतलेले होते. यज्ञ करून मेल्यावर स्वर्ग मिळतो; स्वर्गांत अप्सरा मिळतात; निरनिराळे उपभोग मिळतात; वगैरे गोष्टींचें आकर्षण त्या वेळच्या समाजापुढें होतें. त्यामुळें बाराहि महिने समाज पशुहत्या होणाऱ्या ठिकठिकाणच्या यज्ञयागांत गुंतलेला होता. अश्वमेधासारख्या यज्ञांत सहाशें नऊ पशु लागतात; पैकीं ग्राम्य पशूंना मारावयाचें व अरण्यपशूंना सोडून द्यावयाचें वगैरे विधि आहेत. **पशूंची यादी:**—घोडा, बैल, गाय, हत्ती, उंट, वाघ, सिंह, गाढव, रेडा, बकरा, डुक्कर, बोकड, हरीण, काळवीट, गवाल, माकड, मांजर, लांडगा, कुत्रा, उंदीर, मुंगूस, साप, अजगर, सुसर, मासा, बेडूक, हंस, बक, घुबड, पोपट, मोर, कबूतर, गरूड, साळुंकी, कोंबडा, कोकिळा, चिमणी वगैरे ( योगीश्वर याज्ञवल्क्य–श्री. रा. गो. कोलंगडे-कृत, पान १२० पहा ). अश्वमेधासारख्या यागांत यजमानानें ऋत्विजांना चारशें गाई, चारशें सुवर्ण नाणीं दक्षिणा द्यावयाची वगैरे विधि आहेत. राजसूय यज्ञांत राजानें **अक्षैर्दीव्यति** । द्यूतक्रीडा खेळली पाहिजे हा विधि आहे, वाजपेय यज्ञ करणारा माणूस सम्राट् होतो, यज्ञांत नुसते पशू मारून उपयोगी नाहींत तर ब्राह्मणांना दक्षिणा दिली म्हणजे यज्ञाचें फल मिळतें अग्निष्टोम यज्ञांत पशूचा अंगयाग झाल्यावर ऋत्विज व यजमान यांनीं

पशूचा कोणता भाग खावा हा विधि आहे. यजमानानें प्लीहा (पानथरी) खावी, ब्रह्मा यानें उजवें फुप्फुस खावें, वगैरे विधि आहेत (योगीश्वर याज्ञवल्क्य, पान ७९ पहा). यज्ञाला द्रव्यदान, पशुदान, धान्यदान आणि समिधांसाठीं शेंकडों झाडें तोडणें व त्यांच्या समिधा यज्ञाला देणें वगैरे दानें दिल्यानें व त्याशिवाय स्वतंत्रपणें फक्त हजारों ब्राह्मणांना अन्नदान, वस्त्रदान, धनदान व गोदान दिल्यानें पुण्य लागतें, ही ठाम समजूत त्या वेळच्या समाजाची होती. त्या वेळीं दान देणाऱ्याकडून ब्राह्मणेतर गोरगरिबांना मदतीची फार आवश्यकता होती; तिकडे यज्ञ करणाऱ्यांचें दुर्लक्ष झालें. आपल्या ऐपतीकडे न पहातां यज्ञासाठीं भरमसाट खर्च करण्याकडे त्या वेळचा धनिक वर्ग, मध्यम वर्ग आणि कनिष्ठ वर्ग होता. यज्ञयाग, व्रतें-वैकल्यें, यांत रात्रंदिवस समाज सारखा गढून गेला होता. पाप केलें तर यज्ञानें तें जातें ही कल्पना. आत्मशुध्दि ही आपल्याच हातीं आहे, वगैरेची समाजाला विस्मृति झाली होती.

## अंतःकरणाची शुध्दता हाच श्रेष्ठ यज्ञ होय

भगवान् गौतम बुध्द

यज्ञांतील ब्राह्मणांचे तंटे त्या वेळीं चालू होते. स्त्री-शूद्रांना वेदज्ञान-बंदी होती; हिंदी अस्पृश्य बांधवांना स्पर्शबंदी, जलबंदी, मंदिरबंदी आणि ज्ञानबंदी होती. विषमता, जातिभेदाचा अतिरेक, क्रूर विचार, हिंदी समाज-धारणेच्याविरुध्द वरिष्ठांचें आचरण होतें; वगैरे गोष्टी पाहून भगवान् गौतम बुध्दाला अत्यंत वाईट वाटलें. "**अंतःकरणाची शुध्दता**" हाच श्रेष्ठ यज्ञ होय. शील, समाधि आणि प्रज्ञा यांच्या योगानें अंतःकरणाची शुध्दि होते; हाच यज्ञ होय. हा बुध्दानें उपदेश केला. दीघनिकाय--कूटदंतसूत्र--कै. चिं. वै. राजवाडेकृत मराठी भाषान्तर १५३ ते १७० पहा. कूटदंत ब्राह्मण व भगवान् बुद्ध यांचा संवाद पुढीलप्रमाणें झाला —

**कूटदंत** भगवान् बुध्दाला विचारतो—षोडशपरिष्कारयुक्त असे तीन यज्ञ आपणांस माहीत आहेत, ते मला आपण सांगा. मला महायज्ञ करावयाचा आहे. मी यज्ञासाठीं सातशें बैल, सातशें गोऱ्हे, सातशें कालवडी, सातशें बोकड आणि सातशे मेंढे आणून खांबाला बांधले आहेत. त्यावर भगवान् बुध्द म्हणाला, पूर्वी महाविजित राजाला यज्ञ करण्याची इच्छा झाली. तेव्हां त्यानें आपल्या

ब्राह्मण पुरोहिताला बोलाविलें व विचारलें कीं, ' मी महायज्ञ करूं इच्छितों. तो माझ्या हितास व सुखास कसा कारण होईल तें सांगा'. पुरोहित म्हणाला, ' आपल्या राज्यांत गांवांवर, नगरांवर व रस्त्यांवर दरवडे पडतात, चोऱ्या-माऱ्या होतात. लोकांना त्याचा उपद्रव होतो. या वेळीं जर लोकांवर यज्ञकर बसविला तर लोकांना उपद्रव होईल.

## जनतेची सेवा हाच खरा राजधर्म व हाच खरा यज्ञ

**तेव्हां महाराजांनीं शेतकरी वर्गाला, गोरक्षण करणाऱ्या वर्गाला बीं-बियाणें व अन्नधान्य पुरवावें, व्यापारी वर्गाला व्यापारासाठीं भांडवल द्यावें, सरकारी नोकरांना अन्न वस्त्र व भरपूर वेतन द्यावें, म्हणजे ते लोक आपलीं कामें प्रामाणिकपणें करतील, राज्यकारभार उत्तम चालेल आणि वसूलही पुष्कळ वाढेल; राज्यांत पूर्ण शांतता राहील, चोऱ्या-माऱ्या होणार नाहींत; हा राजधर्म आपण प्रथम करावा.** नंतर यज्ञाचा विचार करावा. त्याप्रमाणें राजानें पुरोहिताचा सल्ला ऐकला आणि तो कृतींत आणला. त्यामुळें त्याच्या राज्यकारभारांतील दोष, गोंधळ व असंतोष नाहींसा झाला. प्रजा आणि नोकर आनंदी झाले. यज्ञाला मान्यता देणाऱ्या लोकांचे चार प्रकार, राजाच्या अंगचे आठ गुण, पुरोहिताच्या अंगचे आठ गुण, यज्ञाच्या पूर्वीं, यज्ञाच्या नंतर व यज्ञ चालू असतां राजाला यज्ञासाठीं धन खर्चिल्याबद्दल वाईट न वाटणें, यज्ञासाठीं धन खर्चिण्यापूर्वी राज्यांतील प्रजेला सर्व प्रकारचें स्वास्थ्य पाहिजे, तें नसल्यास यज्ञ धार्मिक ठरणार नाहीं' वगैरे माहिती पुरोहितानें महाविजित राजाला सांगितली.

## भगवान् बुद्धाचा उपदेश अशोकाला पटला

१ **पंचशीलें** पाळा—१ मी प्राणघात करणार नाहीं. २ मी चोरी करणार नाहीं. ३ मी परस्त्रीगमन ( स्त्रीनें परपुरुषगमन ) करणार नाहीं. ४ मी खोटें बोलणार नाहीं. ५ मी दारू पिणार नाहीं, मादक पदार्थांचें सेवन करणार नाहीं. असा नियम करावा, व दररोज माणसानें हीं पांच शीलें पाळावींत.

( तुंगारकृत बुद्धभजनें )

खून चोरी व्यभीचार खोटि वाणी तैसें मद्य ।
सोडा तुम्ही रात्रंदिन शुद्ध व्हाल साक्षी बुद्ध ।

**२ न जच्चा वसलो होति, न जच्चा होति ब्राह्मणो ।**
**कम्मुना वसलो होति, कम्मुना होति ब्राह्मणो ॥ १ ॥**

मनुष्य जन्मानें चांडाळ होत नाहीं व जन्मानें ब्राह्मण होत नाहीं. मनुष्य वाईट कर्मानें चांडाळ होतो व चांगल्या कर्मानें ब्राह्मण होतो. मनुष्य जातीनें श्रेष्ठ ठरत नसून, कर्मानें श्रेष्ठ ठरतो.

**३ नहि वेरेन वेरानि सम्मन्तीध कुदाचन ।**
**अवेरेन च सम्मन्ति एस धम्मो सनंतनो ॥ २ ॥**

वैर केल्यानें वैरें शांत होत नाहींत तर वैर न केल्यानेंच वैरें शांत होतात; हा जुना धर्म आहे ( घाण जागा धाण पाण्यानें स्वच्छ होत नाहीं; तर धाण जागा स्वच्छ पाण्यानें स्वच्छ होते. धम्मपद, अट्ठकथा ) १.

४ हे भिक्षूंनों तुम्हीं बहुजनसमाजाच्या हितासाठीं, सुखासाठीं फिरती करा. **चरथ भिक्खवे बहुजनहिताय सुखाय ।**

## हें अशोकाला पटलें

मंगलसुत्त, पराभवसुत्त, वसलसुत्त—या सूत्रांत भगवान् बुद्धाचा उत्कृष्ट उपदेश आहे. भगवान् बुद्धाचे पाली भाषेंतील धर्मग्रंथ आपली उन्नति करूं इच्छिणाऱ्या जगांतील कोणत्याही स्त्री-पुरुषाला वाचण्याला पूर्ण अधिकार आहे; तेथें ज्ञानबंदी नाहीं; त्याचप्रमाणें भारतयि बौद्ध धर्माची दीक्षा घेण्याला सर्वांना अधिकार आहे. बुद्ध, धर्म, संघ, हीं तीन शरणें घेणें व पंचशीलें पाळणें म्हणजे भारतीय बौद्ध होणें होय. बौद्ध धर्मांत जातिभेद व अस्पृश्यता नाहीं. माणसानें पापें न करतां शुद्ध आचरण ठेवणें यांत त्यांचा उद्धार आहे. हें अशोकाला पटलें.

१ सम्राट् **अशोकाचे चौदा शिलालेख** मूळ मागधी ( पाली ) भाषेंत आहेत व ते अशोककालीन ब्राह्मी लिपींत लिहिलेले आहेत. अशोकाच्या साम्राज्याच्या चारी दिशांच्या सीमांवर ते सांपडलेले आहेत. ते पुढीलप्रमाणें आहेत.

१ उत्तरेस खैबरघाटाजवळ **शहाबाजगड** येथें ( खरोष्ट्री लिपींत शिलालेख ).

२ हजारा जिल्ह्यांत ॲबटाबादजवळ **मानशेरा** या गांवीं ( खरोष्ट्री लिपींत शिलालेख ).

३ डेहराडून मसुरीजवळ हिमालयाच्या पायथ्याशीं यमुना व टोन नद्यांच्या संगमावरील **कालसी** या गांवीं.

४ जुनागडजवळील **गिरनार** पर्वतावर.

५ मुंबईजवळील **सोपारा** या गांवीं.

६ मद्रास राज्यांतील करनूळ जिल्ह्यांतील **येरागुडी** येथें.

७ बंगालच्या उपसागराजवळील भागांत.

८ गंजम जिल्ह्यांत **जौगड** येथें.

९ उत्तरेस पुरी जिल्ह्यांत **धौली** येथें.

याशिवाय अशोकाचे दुय्यम **शिलालेख, स्तंभलेख** व **गुहालेख** आहेत.

**२ अशोकाच्या शिलालेखांचे संशोधक**—पालीभाषाचार्य, बौद्ध महापंडित, गु. कै. धर्मानंद कोसंबी, यांनीं मूळ पालींतील शिलालेख " पाली रीडर " यांत छापले आहेत. यापूर्वी हॉजिस, हॅरिंग्टन, प्रिन्सेप सेनार्ट, बुह्लर, फॅंक, स्मिथ, फ्लीट, मायकेल्सन्, सर भांडारकर, मुकर्जी, जयस्वाल, बारुआ, कुलेनर वगैरे जर्मन, फ्रेंच, ब्रिटिश व भारतीय विद्वानांनीं त्यांचें संशोधन केलें. पालीं भाषेचे प्रसिद्ध विद्वान् गु. प्रो. डॉ. पु त्रि बापट, दिल्ली युनिव्हर्सिटी, यांनीं मराठींत लेख लिहिला आहे. तो मनोरंजन मासिकाच्या फेब्रुवारी व जून १९५३ आणि ऑगस्ट व नोव्हेंबर १९५४ च्या अंकांत प्रसिद्ध झाला आहे.

## अशोकाचे शिलालेख

### अशोकाची पहिली राजाज्ञा

**पाली** – देवानं पियस्स पियदास्सिनो धम्मलिपियो । अयं धम्मलिपि देवानं प्रियेन प्रियदसिना राजा लेखापिता । इध न किंचि जीवं आरभित्वा प्रजुहितव्य न च समाजो कतव्यो । बहुकं हि दोसं समाजम्हि पसति देवानं प्रियो प्रियदसि राजा । अस्तिऽपि तु एकचा समाजा साधुमता देवानं प्रियस्स प्रियदसिनो राञ्ञो । पुरा महानसम्हि देवानं प्रियस्स प्रियदासिनो बहूनि प्राणसत सहस्रानि आरभिसु सूपाथाय से अज यदा अयं धंमलिपि लिखिता ती एव प्राणा आरभरे सूपाथाय द्वो मोरा एको मगो । सोऽअपि मगो न ध्रुवो । एतेऽपि त्री प्राणा पछा न आरभिसरे ।

**अर्थ—ही धर्मलिपी म्हणजे ही राजाज्ञा हा धर्मलेख देवानं प्रिय म्हणजे लोकांचें प्रिय पहाणाऱ्या म्हणजे देवांना प्रिय, आवडता असलेला; देवाची कृपादृष्टि असलेल्या प्रियदर्शी राजानें लिहून घेतली आहे.**

**येथें कोणत्याहि जीवाला बली देण्यांत देऊं नये किंवा समाज म्हणजे जलसा करूं नये. कारण देवानंप्रिय प्रियदर्शी राजा जलशांत पुष्कळ दोष पहात आहे. तथापि देवानंप्रिय प्रियदर्शी राजाच्या दृष्टीनें ठराविक जलसे चांगले आहेत. पूर्वी देवानंप्रिय प्रियदर्शी राजाच्या स्वयंपाकघरांत दररोज हजारों प्राण्यांची हत्या होत होती. परंतु आतां ही राजाज्ञा लिहिली, त्या वेळीं फक्त तीनच प्राणी मारण्यांत आले आहेत. दोन मोर व एक हरीण. हरीणही रोज मारले जात नाहीं. आतां यानंतर हेही तीन प्राणी मारले जाणार नाहींत.**

## स्पष्टीकरण

### पशुहत्येचीं चार कारणें

अग्निष्टोम, अश्वमेध या यज्ञांत ६०९ पशू मारावेत ही आज्ञा पहा. ( १ ) पूर्वीच्या काळीं यज्ञांत पशू मारून त्याच्या मांसाचा, चरबीचा थोडा भाग, यज्ञांतील अग्नीला समर्पण करून नंतर अग्नीचा प्रसाद म्हणून मांस खाण्याची पद्धत मोठ्या प्रमाणांत होती. (२) अंबादेवी, कालीमाता, म्हाळसा आणि क्षेत्रपाल यांना नवसासाठीं पशूंचा बळी देऊन, नंतर प्रसाद म्हणून मांस खाण्याची पद्धत मोठ्या प्रमाणांत होती. (३) बाग, शेती यांची नासाडी करणाऱ्या पशूंची शिकार करून मांस खाण्याची पद्धत होती. ( ४ ) घरीं कोणी पाहुणा आल्यास मांसाच्या पदार्थांची त्याला मेजवानी देण्याची पद्धत होती.

**( ५ ) पशुहत्या करूं नये याबद्दल धर्मग्रंथाचे आधारः—**

**तीन भवनमें भरे रहे स्थावर जंगम जीव ।**
**सब मत भक्षक देखिये, रक्षक जैन सदैव ।** जैन धर्म.

**यक्षरक्षः पिशाचान्नं मद्यमांसं सुरासवम् ।**
**तद् ब्राह्मणेन नात्तव्यं देवानामश्नता हविः।**

मनु. ११–९५

मद्य, मांस, मादक पदार्थ हे यक्ष, राक्षस व पिशाच्च यांचें अन्न आहे. म्हणून ब्राह्मणांनीं यज्ञयागादिकांत देवाला मांसाचा हविर्भाग देऊं नये व आपणही मांस भक्षूं नये, तसेंच मद्य पिऊं नये.

**अनुमंता विशसिता निहंता क्रयविक्रयी ।**
**संस्कर्ता चोपहर्ता च खादकश्चेति घातकः ।** मनु.

मांस खाण्याला अनुमोदन देणारा, कापणारा, मारणारा, विकणारा, विकत घेणारा, नेणारा, शिजविणारा व खाणारा हे हिंसक होत.

## पशुहत्या करणारे लोक कृतघ्न होत.

गाई, म्हशी, शेळ्या, यांच्यापासून माणसाला दूध मिळतें. दूधापासून दहीं, ताक आणि लोणी हे जीवनाला आवश्यक असे पदार्थ यिळतात.

**दूध, दहीं, ताक, पशूंचें पालन । त्यामध्यें कारण घृत सार ।**

—तुकाराम महाराज

बैल, टोणगे, घोडे आणि उंट हे पशू नांगरण्याच्या कामीं किंवा गाड्या ओढण्याच्या कामीं किंवा ओझीं वाहण्याच्या कामीं उपयोगी पडतात, बोकड-मेंढ्या वगैरेपासून मानव समाजाला लोंकर मिळते. त्या लोंकरीपासून थंडीचे दिवसांत थंडीपासून निवारण व्हावें म्हणून लोंकरीचीं उबदार वस्त्रें बनवितां येतात. पाण्यांत मासे असल्यानें पाणी स्वच्छ राहातें. गांवांतील डुकरें व कोंबड्या हे पशुपक्षी दुर्गंधीचा नाश करतात, त्यामुळें हवा स्वच्छ होते. त्याशिवाय पशुपक्षी, मासे वगैरे निरुपद्रवी प्राण्यांपासून वनस्पतीसाठीं खत मिळतें. मेल्यावर त्यांचें चामडें, शिंगें, हाडें, हे पदार्थ माणसाला देऊन आपल्या जीवनाचें पशू सार्थक करतात.

वाघापेक्षांही ज्ञान इत्यादि गुणांनीं युक्त असा माणूस जेव्हां यज्ञ, नवस व पाहुणचार यांच्या निमित्तानें पशु-पक्ष्यांची कत्तल करतो. तेव्हा हें त्याचें कृत्य वाघापेक्षांही क्रूर व कृतघ्न, सर्वभूतद्वेषी, विश्वासघातकी, नीच, आणि अन्यायी असें आहे हेंच ठरेल. माणूस जसा मरणाला भितो तसे पशु-पक्षीही मरणाला भितात.

जेव्हां माणूस पशूंना, पक्षांना मारतो, तेव्हां प्राण वांचविण्यासाठीं तो प्राणी काकुळत्या वाणीनें आं, ऐं, बों, बें, चां, चीं, फडफड, किरकिर, वळवळ फार मोठ्या प्रमाणांत करतो—मुक्या वाणीनें जीव घेणाऱ्या माणसाला तो प्राणी म्हणतो—हे ज्ञान-दयासंपन्न माणसा ! तुझ्या व तुझ्या मानव समाजाच्या आम्ही नेहमीं उपयोगी पडतों, त्याची फेड या कृतघ्न-कृत्यानें तूं फेडतोस कां रे ? तुला मी शरण आलों आहे; मला तूं जीवदान दे.

**ब्रह्मवैवर्त पुराण – प्रकृतिखंड, अध्याय ३५**

**सुरां मत्स्यान् मधुमांसमासवं कृशरौदनम् ।**
**धूर्तैः प्रवर्तितं ह्येतन्नैतद्वेदेषु कल्पितम् ॥१॥**

अर्थः—दारू, मासे, मध, मांस, मादक पदार्थ, हे माणसांनीं सेवन करावेत, असा लबाड लोकांनीं नियम केला आहे. खुद्द वेदांमध्यें याचा मागमूसही नाहीं.

**पद्मोत्तरखंड—देवी म्हणते—**

**देवयज्ञे पितृश्राद्धे तथा मांगल्यकर्मणि ।**
**तस्यैव नरके वासो यःकुर्याज्जीवघातनम् ॥२॥**
**मद्व्याजेन पशून् हत्वा यो भक्षेत् सह बन्धुभिः ।**
**तद्गात्रलोमसंख्याब्दैरसिपत्रवने वसेत् ॥३॥**

यज्ञामध्यें, श्राद्धामध्यें, मंगल कार्यांत, जो माणूस जीवहत्या करील, त्याला नरकांत राहावें लागेल. मला उद्देशून जो माणूस पशूला मारून आपल्या नातेवाइकांसह त्याचें भक्षण करील, त्याला त्या पशूच्या अंगावरील केंसांच्या संख्येइतकीं वर्षें रौरव नरकांत राहावें लागेल.

**अवेस्ता, पारशी धर्मग्रंथ** गाथा- ३१–३२. जे पशूला मारून टाकण्याबद्दल आनंदानें शिफारस करतात त्यांची आहुरमज्द दुष्ट म्हणून गणना करतात.

**मुसलमानी धर्मग्रंथ कुराण**—मंजल ३, आयत ३. तात्पर्यः—मक्केच्या हद्दींत प्राणी मारूं नयेत, मारल्यास घरचें जनावर तेथें आणून ठेवणें किंवा तेवढी किंमत देऊन गरिबांना अन्नदान करणें.

**अकबर बादशहानें असें म्हटलें आहे कीं,** मी माझें पोट दुसऱ्या जीवांचें कबरस्थान करणार नाहीं.

**कुराण**—समस्त जीवोंपर रहेम राखो. अर्थ–सर्व जीवांवर प्रेम करा. विशेष म्हणजे सूफी पंथाचे मुसलमान लोक मांस खात नाहींत.

**ख्रिश्चन धर्मग्रंथ बायबल**—सहावें फर्मान–हिंसेंत पाप आहे.

**शीखधर्मगुरु नानक ग्रंथसाहेब धर्मग्रंथांत—**

**जे रत्त लग्गे कप्पडे जामा होय पलित्त ।**
**ते रत्त खादी मानसा किं ते निर्मल चित्त ॥**

अर्थ—कपड्यांवर रक्ताचा डाग पडल्यास देह अपवित्र होतो, तर तें रक्त माणसाच्या पोटांत गेल्यास, त्याचें चित्त निर्मळ कसें बरें राहील?

तात्पर्य, दूध देणाऱ्या गाई, म्हशी, शेळ्या किंवा शेतीला उपयोगी पडणारे बैल, रेडे, वगैरे मानवांची सेवा करणारे पशू यांना मारणें हें कृतघ्नपणाचें आहे. हें जाणून अशोकानें पशुहत्या बंद केली.

## संतांचा पशुहत्यानिषेध

### ज्ञानेश्वर महाराज—

पुण्यासी जोडितां पापचि जोडिजे । तेणेंचि पाविजे अधोगति ॥१॥
सोमयाग श्रेष्ठ करितां पावन । करावे हनन पशु तेथें ॥२॥
तेंचि ते या दोष तयालागीं जन्म । भोगिजेती कर्म पशु योनी ॥३॥
पुण्य तेथें पाप समचि वर्तती । रात्रंदिन आथी जियेपरी । ४॥

अभंग–२४१०

### एकनाथ महाराज—

३२९१ भजन चाललें उफराटें । कोण जाणे खरें खोटें ॥१॥
अग्निहोत्राचा सुकाळ । वडापिंपळासी काळ ॥२॥
तिन्ही देव पिंपळांत । अग्निहोत्रीं केला घात ॥३॥
म्हणती सोमयाग करा । मुख धरूनी मेंढा मारा ॥४॥

३२९२ एका जनार्दनीं नेम । सर्वांठायीं पुरुषोत्तम ॥
देव म्हणती मेसाबाई । पूजाअर्चा करिती पाही ॥१॥
नैवेद्य वहाती नारळ । अवघा करिती गोंधळ ॥२॥
मेंढरें बोकड मारिती । सुटी रोटी तया म्हणती ॥३॥
बळेंचि आणिताती अंगा । नाचताती शिमग्यासोंगा ॥४॥
सकळ देवांचा हा देव । विसरती तया अहंभाव ।
एका जनार्दनीं ऐसा देव । येथें कैंचा आमुचा भाव ॥५॥

३२९३ प्रेमें पूजी मेसाबाई । सांडोनिया विठाबाई ॥१॥
काय देईल ती वोंगळ । सदा खाय अमंगळ ॥२॥
आपुलिये इच्छेसाठीं । मारी जीव लक्षकोटी ॥३॥
तैसी नोहे विठाबाई । सर्व दीनांची ती आई ॥४॥
न सांडीचि विठाबाई । एका जनार्दन पायीं ॥५॥

( सकलसंतगाथा-श्री. गो. शं. राहिरकर, श्री. बाहिरटकृत )

## भूतदयेच्या कोर्टांत दयानंदांचें भाषण

**स्वामी दयानंदसरस्वती चरित्रः**—पापी वर्तन करून देवपूजेचें अवडंबर करूं नये. अशी मूर्तिपूजा करूं नये, देवालयांचा उपयोग अनीतिवर्धक कामाकडे किंवा आळसाचें माहेरघर यांकडे होऊं नये. देवालयांचा शाळेसारखा उपयोग व्हावा. शुद्ध, अद्वितीय अशा परमेश्वरानें सृष्टीचे आरंभीं वेदांच्याद्वारें जें ज्ञान मानवांना दिलें, त्या वेदांवर, त्यांतील ज्ञानावर, स्त्री-शूद्रादि सर्व मानवांचा सारखाच जन्मसिद्ध वारसा आहे. वेदज्ञान सर्वांना देणें, वगैरेचा विचार, उच्चार, आचार आणि प्रचार, स्वामी दयानंदांनीं **'आर्यसमाज'** या स्वस्थापित पंथाच्या आणि ग्रंथाचेद्वारां केला. (**दयानंद चरित्र**–हरि सखाराम तुंगार) पान १५३, १५४–स्वामी दयानंदांनीं भूतदयेच्या कोर्टांत मूक जीवांतर्फे जी वकिली केली ती अशी–सूज्ञ आणि सद्गुणी बांधवहो! तुम्ही या गरीब मुक्या प्राण्यांचे कंठ कापण्याऐवजीं त्यांचें शरीरानें आणि धनानें पालनपोषण कां बरें करीत नाहीं? हे प्रभो, किती ही हृदय विदीर्ण करणारी स्थिति आहे कीं, गाई, बकरीं व इतर उपयुक्त पशूंची तशींच कोंबडीं, बदकें, कबुतरें वगैरे पक्ष्यांचीं अंतःकरणें दुःखानें कशीं भयभीत होतात, त्यांचे हात-पाय घट्ट आवळून, त्यांच्या मानेवर सुरी ठेवतात तेव्हां ते निरुपद्रवी बिचारे पशु-पक्षी, कापणाराकडे किती केविलवाणें बघतात, हृदयास प्रेमपाझर फोडणाऱ्या किंकाळ्या फोडतात, तरी देखील त्या ईश्वरानें आपल्या स्वरूपाप्रमाणें मनुष्य उत्पन्न केला, असें जगास सांगणाऱ्या त्या प्रेमाच्या पुतळ्यांना दयेचा स्पर्श देखील होऊं नये ना! आर्यावर्ताचे ते नागरिक धन्य होत कीं, ज्यांनीं सृष्टिनियमांचे सनातन कायदे अत्यंत भूतदयेनें पाळले, ज्यांनीं आपले प्राण व धन परोपकारार्थ, जीवदानार्थ वेंचिलें. त्याच प्रमाणें आर्य-नृपतींनीं पशुपक्ष्यांच्या पोषणार्थ जंगलें राखून ठेविलीं, पांजरपोळ स्थापन केले, जीवदया-मंडळ स्थापिलें. पशूंच्या रक्षणानें दूध, तुपादि पौष्टिक अन्नांची समृद्धि करून शौर्य, पराक्रम, आरोग्य व बुद्धि, यांची जोड मिळविली, जंगलांमुळें वृक्षांचें रक्षण झालें आणि वृक्षांमुळें पर्जन्य, शुद्ध हवा, वनश्रीची नयनमनोहर शोभा व ईश्वरचिंतनास लागत असलेलीं रम्य स्थळें, त्यांनीं निर्माण केलीं; परंतु सांप्रतकाळीं त्याच आर्यांचें संतान केवळ सुखलोलुप बनून शक्ति प्राप्त होण्यासाठीं (?) यथेच्छ मांसाहार करितात. इतकेंच

नव्हे, तर देवादिकांच्या नैवेद्याकरितां प्रतिवर्षी रक्ताच्या नद्या व पाट वाहवतात. धन्य ते राक्षसी देव व त्यांचे अमानुष भक्त ! ! !

**हे प्रभो, आतां तूं तरी धांवून ये व ह्या आर्य संतानांच्या हृदयांत तूं आपल्या दयेचा अंश कृपा करून घाल; म्हणजे दीन, अनाथ प्राण्यांचे शाप ह्या देशास न लागतां आम्ही पूर्ववत् सौख्यशांति यांचा अनुभव मिळवूं ! ! जर तूं या वेळीं आमची दीनांची प्रार्थना ऐकणार नाहींस, तर या जगांतील पशु-पक्ष्यांची झाडून कत्तल होईल व निर्बल मानवांच्या रक्ताचे पाट बलवान् नरभक्षक लोक वाहविल्यावांचून राहणार नाहींत.**

## गाईम्हशींची मानवसेवा

**ऋग्वेद—यूयं गावो मेदयथ कृशानि।** – हे गोमातांनो, तुम्ही लुकड्या व्यक्तींना आपल्या दूधरूपीं अमृतानें धष्टपुष्ट करतां.
संस्कृत वर्णन – **सुभाषितकार—**

**तृणानि शुष्काणि वने चरित्वा, पीत्वापि तोयम् अमृतं स्रवन्ति ।**
**यद्गोमयाद्याश्च पुनन्ति लोकान्, गोभिर्न तुल्यं धनमस्ति किञ्चित्॥१॥**

गाई रानांत चरून, पाणी पिऊन, दूधरूपीं अमृत देतात. शेणानें जमीन सारवणें, शेणाच्या गोवऱ्यांचें जळण, नंतर त्यांच्या राखेनें भांडीं घांसणें, शेणाच्या गोवऱ्यांची राखुंडी करून दांत स्वच्छ घांसणें, या मानवांच्या गरजांसाठीं गाई शेण देतात व मानवांना पवित्र करतात. म्हणून गाईसारखें दुसरें धन नाहीं.

**बौद्धवाङ्मय-सुत्तनिपात-ब्राह्मणधम्मिकसुत्त गाथा-१२**

**उपट्ठितस्मिं यञ्ञस्मिं नास्सु गावो हनिंसु ते ॥ १२ ॥**
फार पूर्वीचे ब्राह्मण यज्ञांत गाई मारीत नसत.

**यथा माता पिता भाता, अञ्ञे वाऽपि च ञातका ।**
**गावो नो परमा मित्ता, यासु जायन्ति ओसधा ॥ १३ ॥**

जसे आई-बाप, भाऊ किंवा इतर सगेसोयरे, तशा गाई आमच्या परम मित्र होत. कारण पंचगोरसादि औषधें त्यांच्यापासून मिळतात.

**अन्नदा बलदा चेता वण्णदा सुखदा तथा ।**
**एतमत्थवसं ञत्वा नास्सु गावो हनिंसु ते ॥ १४ ॥**

त्या गाई अन्न देणाऱ्या, बल देणाऱ्या, कांति देणाऱ्या, सुख देणाऱ्या आहेत. हें तत्त्व जाणून ते प्राचीन ब्राह्मण गाई मारीत नसत.

## वन्य पशुपक्षी हा आपला बहुमोल वारसा
## मुंबई राज्याच्या मुख्य मंत्र्यांची विनंति

महाराष्ट्र राज्यांत दिनांक २३ ते २९ सप्टेंबर १९५७ च्या दरम्यान दुसरा वन्य पशुपक्षी सप्ताह पाळण्यांत आला. हा सप्ताह पाळण्यांत मला सहभागी होतां येत असल्यामुळें माझ्या आनंदांत भर पडली आहे.

आपल्या देशांतील जंगलांत नाना प्रकारच्या वनस्पती व प्राणी आहेत. ही आपली राष्ट्रीय संपत्ति असून तिची जपणूक जंगलांचें निर्दय-पणें निर्मूलन न करतां आणि वन्य पशुपक्ष्यांची वाटेल तशी शिकार न करतां, निसर्गांतील समतोलपणा कायम राखूनच करतां येईल. आपल्या या कृषिप्रधान देशाच्या जीवनांत वन्य पशुपक्ष्यांना किती महत्त्वाचें स्थान आहे, हें सर्वांना माहीत आहेच, जंगलामुळें धुळीच्या वावटळी उठणें, नद्यांना पूर येणें, जमिनीची धूप होणें व जमीन टाकाऊ होणें, यांसारख्या गोष्टी टळतात. यावरून जंगलें किती महत्त्वाचीं आहेत याची कल्पना येईल. तेव्हां या देशांतील वनश्रीची शोभा कायम ठेवावयाची असेल तर आपणांस जंगलांतील वनस्पती व प्राणी यांची जपणूक करावी लागेल.

म्हणून आपण देशांतील वन्य पशुपक्ष्यांचें रक्षण करण्याची प्रतिज्ञा करावी, अशी माझी आपणांस नम्र विनंति आहे. त्यामुळें आपला हा बहुमोल वारसा कायम राहून, देशाचें भावी जीवन समृद्ध व आनंदमय होईल.

नामदार **यशवंतराव ब. चव्हाण**
महाराष्ट्रराज्याचे मुख्यमंत्री.

**वन्य पशुपक्ष्यांचें संरक्षण करून आपली राष्ट्रीय संपत्ति जतन करा. तुम्हांला त्यांच्यावर नेमच धरायचा असेल तर तो कॅमेऱ्यानें धरा.**

# प्रतिज्ञा

वन्य पशुपक्ष्यांची बहुमोल संपत्ति जतन करणें आणि तिचें संरक्षण करणें हें प्रत्येक नागरिकाचें पवित्र कर्तव्य आहे या कर्तव्याची आठवण होण्यासाठीं प्रत्येकानें पुढील प्रतिज्ञा घेतली पाहिजे :—

**"बुद्ध व गांधी, ह्यांच्या देशांत जन्मलेला व वाढलेला नागरिक या नात्यानें मी अशी निष्ठापूर्वक प्रतिज्ञा करतों की, मी आपल्या देशांतील जंगलांचें व त्यांतील मुक्या प्राण्यांचें व वृक्षवेलींचें निष्कारण हानिकारक होणाऱ्या विनाशापासून संरक्षण करीन"**

( महाराष्ट्रसरकारच्या प्रसिद्धि खात्याच्या कृपेनें वन्यपशुपक्षी सप्ताह २३ ते २९ सप्टेंबर १९५७ सरकारी पत्रक. )

# अशोकाची दुसरी राजाज्ञा

**पाली** प्राकृत सर्वत विजितम्हि देवानं प्रियस प्रियदसिनो राञो एवमपि प्रचंतेसु यथा चोडा पाडा (पंडिया) सतियपुत्तो केतलपुत्तो (केरलपुत्र) आ तंबपंणी, अतियोको योनराजा ये वाऽपि तस अतियकस सामीपं राजानो सर्वत्र देवानं प्रियस प्रियदसिनो राञो द्वे चिकीछा कता, मनुस चिकीछा च पसुचिकीछा च ।

वोसुढानि ( ओसधानि ) च यानि मनुसोपगतानि च । पसोपगतानि च यत नास्ति सर्वत्र षारापितानि रोपापितानि च । मूलानि च फलानि च यत यत नास्ति सर्वत्र हारापितानि च रोपापितानि च पंथेसु कूपा च खानापिता, व्रछा च रोपापिता परिभोगाय पसु मनुसानं ।

**अर्थ - देवानंप्रिय प्रियदर्शी राजाच्या राज्यांत सर्व ठिकाणीं त्याचप्रमाणें त्याच्या शेजारच्या चोड, पांड्य, सत्यपुत्र, केरळपुत्र, वगैरे ताम्रपर्णीपर्यंत असलेल्या राज्यांमध्यें त्याचप्रमाणें यवनराजा आंतियोक आणि त्याच्या शेजारी असलेल्या इतर राजेलोकांच्या राज्यांमध्यें मी देवानंप्रिय प्रियदर्शी राजानें दोन प्रकारच्या चिकित्सेची व्यवस्था केलेली आहे--१ मानवांच्या चिकित्सेची एक व्यवस्था आणि २ जनावरांच्या चिकित्सेची दुसरी व्यवस्था. ३ माणसांना आणि जनावरांना उपयोगी पडतील अशा औषधी-वनस्पती जेथें नाहींत, तेथें त्या त्या वनस्पती बाहेरून, दुसऱ्या ठिकाणाहून आणविल्या आहेत व चोहोंकडे त्यांची लागवड करविली आहे. ४ कंदमुळें आणि फळझाडें ज्या प्रांतामध्यें होत नाहींत, तेथें तीं बाहेरून आणवून लाविलीं आहेत. ५ माणसांना**

**आणि पशूंना संतुष्ट करण्यासाठीं रस्त्यांवर ठिकठिकाणीं विहिरी खोदविल्या आहेत व ६ झाडें लावविलीं आहेत.**

### स्पष्टीकरण:—

## आजाऱ्यांची सेवा करा

( १ ) खेड्यांत किंवा शहरांत गरीब माणसांपैकीं कोणी आजारी पडल्यास त्याला औषध देण्याचें सामर्थ्य त्याच्या गरीब नातेवाइकांना नसतें. त्यामुळें अनेक गरीब माणसें, बालकें, बाया, मृत्युमुखीं पडतात. त्याचप्रमाणें शहराच्या आसपासची खेडीं सोडल्यास इतर खेड्यांतून दवाखाने, वैद्य किंवा डॉक्टर अथवा हकीम नसतात. त्यामुळें हीं मृत्युसंख्या जास्त होते. तसेंच खेड्यांत जनावरांचे दवाखाने नसतात. एखाद्या जनावराचा मोडलेला किंवा दुखावलेला पाय मलमपट्टी बांधून नीट केला तर तें जनावर अश्रुपूर्ण डोळ्यांत कृतज्ञता व्यक्त करतें. आजारी माणसाला बरें केल्यास तो जन्मभर उपकार मानतो. अमेरिकन ख्रिश्चन मिशनऱ्यांनीं हिंदुस्थानांत मोठमोठाले मोफत दवाखाने काढून, हिंदी जनतेची फार मोठी सेवा केली आहे. त्याबद्दल त्यांना आम्ही सहस्रशः धन्यवाद दिले पाहिजेत आणि त्यांचे उपकार मानिले पाहिजेत. यापुढें त्यांचें अनुकरण आपल्या जनतेनें, डॉक्टरांनीं, वैद्यांनीं व हकिमांनीं, तसेंच दानशूरांनीं व सरकारनें जरूर केलें पाहिजे.

## नेहमी देशी औषधांचाच उपयोग करा

सन १९४६ पर्यंत हिंदुस्थानांत शेंकडा साठ टक्के औषधें येथील औषधांच्या कारखान्यांत उत्पन्न होत होतीं, परंतु १९५३ मध्यें शेंकडा आठ टक्के औषधेंच फक्त हिंदुस्थानांत उत्पन्न होत आहेत. १९५१-१९५२ मध्यें १५ कोटी रुपयांचीं परदेशी औषधें हिंदुस्थानांत खपलीं. यावरून यापुढें वनस्पतींची लागवड, त्यांचें संशोधन, डॉक्टरांनीं व वैद्यांनीं मिळून केलें पाहिजे. त्यांचीं औषधें बनविण्याचे शेंकडो कारखाने निघाले पाहिजेत, औषधें बनविण्याचें शिक्षण देणाऱ्या लहानमोठ्या शाळा ठिकठिकाणीं निघाल्या पाहिजेत. परदेशी औषधांना कायमची बंदी झाली पाहिजे. सध्यां आपण परदेशी कोट्यवधि रुपयांचीं औषधें विकत घेऊन, परदेशाचीच भर करीत आहोंत. हें महापाप आहे. हें जर सर्वांनीं जाणलें व परदेशी औषध शक्य तों वापरावयाचें नाहीं, देशी औषधेंच वापरावयाचीं असें ठरविलें व येथेंच

देशी औषधांचे कारखाने यापुढें काढले तर बेकारीच्या प्रश्नालाही थोड्या प्रमाणांत दूर करण्यास हातभार लागेल.

**यस्य देशस्य यो जन्तुः तज्जं तस्यौषधं हितम् ।**
**देशादन्यत्र वसतः तत्तुल्यगुणमौषधम् ॥** (चरकसंहिता)

जो ज्या देशांतील आहे, त्याला त्या देशांतील औषधी हितावह होय.

## फलवृक्ष लावून फळें खा

(२) कंदमुळें, फळझाडें, यांची लागवड व जोपासना सरकार व जनता यांचेकडून झाल्यास तसेंच फळें टिकविण्याच्या शास्त्राप्रमाणें फळें टिकविलीं गेलीं तर जनतेला फलरस मिळेल. फणसपोळ्या, आंब्याच्या पोळ्या, काजू, मनुका, खारका वगैरे अनेक प्रकारचे खाऊ लहान मुलांना देतां येतील. फळांचा आहार पुष्टिकारक, आरोग्य राखणारा, रोगनाशक, असा आहे. (३) पावसाळ्यांत निष्कारण वाहून जाणारें पाणी तलावांतून, किंवा विहिरींतून अडवून ठेविल्यास पाण्याची गैरसोय होणार नाहीं. (४) ठिकठिकाणीं रस्त्यांच्या दुतर्फा छायावृक्ष लावण्याचें काम केल्यास, उष्णतेची पीडा कमी होऊन पाऊस पडण्यालाही त्याचा उपयोग होईल. वरील सर्व गोष्टींची कृति केली पाहिजे. बौद्ध वाङ्मयांतील महावग्ग ग्रंथांत औषधोपचारासंबधीं मोठें प्रकरण आहे. जीवक कौमारभृत्य, रसायनाचार्य, नागार्जुन या बौद्ध वैद्यांचें कार्य प्रसिद्ध आहे. एक तोळा सिद्धरसानें कोटी तोळे सोनें बनविण्याचें काम नागार्जुनानें केलें होतें. या वेळीं बौद्धकालीन आयुर्वेद शास्त्र उच्च दर्जाला गेलें होतें.

## जंगल म्हणजे वरदान

१ जंगलापासून आपल्याला इमारती लाकूड, जळाऊ लाकूड आणि कोळसा मिळतो. लांकडाशिवाय आपल्याला घरें अथवा जहाजें बांधतां येणार नाहींत अथवा सामान करतां येणार नाहीं. लांकडाशिवाय आपल्याला आपलें अन्न शिजवितां येणार नाहीं.

२ जंगलापासून आपल्याला साली, फळें आणि फुलें वगैरे शोभेचें, साहित्य मिळतें.

३ जंगलामुळें उद्योगधंदे चालण्यास मदत होते, आपल्याला रंग, तेलें, राळ आणि टॅनिन, हे जिन्नस मिळतात. तसेंच जंगलामुळेंच आपल्याला वाळू, माती, कोळसा, दगड, खनिज द्रव्यें आणि धातू मिळतात.

४ जंगलामुळें आपल्याला अन्न आणि निवारा मिळतो. जंगलें हीं सुंदर वन्यपशूंचीं निवासस्थानें असतात,

५ जंगलापासून आपल्या गुरांना चारा मिळतो.

६ जंगलामुळें पाऊस पडतो व आपली भरभराट होते, हवा थंड होते आणि सृष्टिसौंदर्य वाढतें.

७ जंगलें पाणलोटांच्या प्रदेशाचें रक्षण करतात, ओढ्यांचे प्रवाह नियमित करतात, पुरास जंगलामुळें आळा बसतो आणि जमिनीची धूप थांबते.

८ जंगलें सृष्टिसौंदर्य वाढवितात. मानवास त्यांचा तपस्येसारख्या कामास उपयोग होतो.

९ जंगलें सहली काढण्यास, शिबिरें भरविण्यास, शिकार करण्यास व अन्य प्रकारचीं करमणुकीचीं साधनें म्हणून उपयुक्त ठरतात.

१० जंगलामुळें लोकांचें हित होतें. राष्ट्रीय संरक्षणाच्या दृष्टीनें तीं उपयुक्त असतात. आपल्या गरजा भागविण्यास अनेक प्रकारचीं साधन-सामुग्री जंगलांपासून मिळते आणि अनेक लोकांना कामधंदा मिळतो.

जंगलें हीं संपत्तीची खाण होत.

मुंबई सरकारच्या प्रसिद्धि-खात्याच्या कृपेनें
प्रादेशिक प्रसिद्धि कचेरी, पुणें,
१०-१०-५७

**नामदेवमहाराज—**

**जे वृक्ष लाविती सर्वकाळ। तयावरी छत्रांचें झलाळ।**
**जे ईश्वरीं अर्पिती फळ। नानाविध निर्मळ॥**

## मुंबई सरकारनेंच प्रथम वनमहोत्सव चालूं केला.

१ भारतामध्यें सन १९४८ सालापासून मुंबई सरकारनेंच प्रथम वनमहोत्सव चालं केला. नंतर भारत सरकारनें सन १९५० सालापासून

चोहोंकडे वनमहोत्सव चालू केला. वनमहोत्सवांत प्रत्येकानें भाग घेऊन एक रोप लाविलें पाहिजे. जंगलखातें जनतेला रोप मोफत देतें. त्याचा उपयोग सर्वांनीं जरूर करावा.

२ हल्लीं आपल्या देशांत वनमहोत्सवास राष्ट्रीय उत्सवाचा दर्जा प्राप्त झाला आहे. वृक्षारोपणाचा उत्सव हा नवीन नसून तो आपल्या संस्कृति-इतकाच जुना आहे. खरोखर, **वृक्षारोपण** हें राष्ट्रीय पुनरुज्जीवनाचें एक प्रमुख कार्य आहे. **शेती** हा आपला महत्त्वाचा राष्ट्रीय व्यवसाय आहे आणि त्याचें यश मुख्यतः झाडांच्या सुस्थितीवरच अवलंबून आहे. याच जाणिवेनें आपले पूर्वज झाडाला परमोच्च मान देत असत, त्याच्यावर प्रेम करीत असत आणि त्याची पूजाही करीत असत. **वृक्षपूजा** ही प्राचीन कालापासून एक नित्याचीच बाब म्हणून गणली जात होती व वर्षांतील निरनिराळ्या दिवशीं निरनिराळ्या वृक्षांची पूजा करण्याचे उत्सव पाळले जात होते. वटपौर्णिमा, शमीपूजन, आवळी-अष्टमी, अशा तऱ्हेचीं निर-निराळीं नांवें त्या उत्सवांस दिलीं होतीं. वड, उम्बर, पिंपळ, शमी, पारिजातक, इत्यादि झाडांस आपण पूज्य मानतो व त्यांचे ठिकाणीं देव असतो अशी समजूतही आपल्यामध्यें रूढ आहे.

३. गेल्या शतकांत या रूढी नष्ट व्हावयास लागल्या. वाढती लोकसंख्या, शेतास लागणारी अधिक जमीन, जळाऊ लांकूड व इमारती लांकूड यांची वाढती मागणी व वाढते भाव या सर्व गोष्टींमुळें आपण झाडींचा बेसुमार संहार केला व त्यामुळेंच आपलें जीवन असह्य झालें. जंगलाचें आच्छादन नाहींसें झाल्यामुळें जमिनी उजाड होऊन, त्यांवर पडणाऱ्या पावसाचें प्रमाण कमी झालें, जमिनीची धूप वाढली आणि त्यामुळें तिच्या सुपीकपणाही कमी झाला.

४. आपआपल्या भागांत कोणतीं झाडें, उत्तम तऱ्हेनें येतील, तें प्रत्येकास कळावें म्हणून खालील कोष्टक दिलें आहे–( १ ) सह्याद्रीचा पश्चिम उतार, कोंकणपट्टी व घाटमाथा–काजू, फणस, सांवर, साग, जांभूळ, कोकम, शिवण, आंबा, बिवला, बकुळ, अशोक, जैन, हिरडा, भावा,

मेंडी, बांबू, सुरु, शिसम, निलगिरी (युकॅलिप्टस), (२) देश अगर दक्षिणचें पठार, विदर्भ, नागपूर, गुजराथ इत्यादि — साग, भावा, शिसू, आंबा, शिरस, निंब, मोह, सावर, पळस, काशीद, करंज, जांभूळ, कवठ, शिवण, अंजन, विलायती चिंच, चिंच, रायणी, बेल, बोर, आंवळा, सामनी, गुलमोहोर, अशोक, विलायती बाभळ, बिबला, शमी, चंदन, महागनी, बेहडा, मेंडी, बांबू. वनमहोत्सवांत हीं झाडें लावतात.

५. झाड मनुष्यावर सतत उपकारच करीत असतें. आपल्या जीवनाकरितां मनुष्याजवळ झाड कांहींही मागत नाहीं, पण मनुष्याच्या सुखाकरितां मात्र झाडानें आपलें सर्वस्व गरिब-श्रीमंत, लहान-मोठा, सज्जन-दुर्जन, इत्यादि भेद न करतां मुक्ततेनें अर्पण केलेलें आहे. वृक्षपालकास झाडाची जी शीतल छाया मिळते, ती शीतल छाया झाडतोड्यासही मिळते. झाडाबद्दलच्या कृतज्ञतेनें आपण सर्वजण येता वनमहोत्सव साजरा करूं या.

[ नामदार **भगवंतराव गाढे**, जंगलखात्याचे मंत्री, मुंबई राज्य, यांनीं १९५७ च्या आठव्या वनमहोत्सवाचे प्रसंगीं जनतेला वरील उपयुक्त विनंति जाहीर पत्रकद्वारें केली होती. ]

## अशोकाची तिसरी राजाज्ञा

**पाली**—देवानं प्रियो प्रियदसि राजा एवं आह—सर्वत विजिते मम युता च राजुक च प्रादेसिके च पंचसु वासेसु अनुसयानं नियातु एता एव अथाय इमाय धंमानुसस्टिय यथा अञायपि कमाय—साधु मातरि च पितरि च सुस्रुसा मितसंस्तुत ञातीनं ब्राह्मणसमणानं साधु दानं, प्राणानं साधु अनारंभो, अपव्ययता, अपभंडता साधु। परिसाऽपि युते आजापयिसति गणनायं हेतुतो च व्यंजनतो च।

## सरकारी अधिकाऱ्यांनीं प्रजेला धर्माची शिकवण द्यावी

**देवानंप्रिय प्रियदर्शी राजाचें असें म्हणणें आहे कीं, माझ्या राज्याभिषेकानंतर बाराव्या वर्षीं मी आज्ञा केली आहे कीं, १ युक्त (मामलेदार), २ राजुक (महालकरी), ३ प्रादेशिक जिल्ह्याचा अधिकारी ह्या अधिकाऱ्यांनीं प्रत्येक पांच वर्षांनीं राज्यामध्यें सर्व ठिकाणीं दौऱ्यावर निघावें आणि आपल्या आणि इतर सरकारी कामाबरोबर प्रजेला धर्माची गुरुधर्म, शिष्यधर्म आणि पति-पत्नीधर्म, वगैरेंचे धर्म,**

कर्तव्यें यांची शिकवण द्यावी. १ आई-बापांची सेवा करणें चांगलें आहे. २ मित्र, परिचित, आप्तेष्ट, ब्राह्मण व श्रमण, ह्यांच्याशीं उदारपणानें वागणें, त्यांची सेवा करणें चांगलें आहे. ३ प्राण्यांच्या हत्येपासून निवृत्त होणें चांगलें आहे. ४ अल्पव्ययता ( बेताचा खर्च करणें, उधळपट्टी न करणें ), अल्पभांडता ( बेताचा संचय करणें, सांठेबाजी न करणें ), ही चांगली आहे. मंत्रिमंडळानें युक्तांना ( सरकारी अधिकाऱ्यांना ) आज्ञा अशी करावी कीं, हिशेब तपासतांना नियमांच्या बरोबरच ते नियम करण्याच्या मागील हेतु काय आहेत, तें लक्षांत असूं द्यावें.

**स्पष्टीकरणः—जन्मदात्या आई-वडिलांची मुलांनीं सेवा करावी, याबद्दल उपदेश—भागवत**—स्कंध ३ अध्याय २४, श्लोक—१३

**( १ ) एतावत्येव शुश्रूषा कार्या पितरि पुत्रकैः ।**
**बाढमित्यनुमन्येत गौरवेण गुरोर्वचः ॥ १ ॥**

मुलांनीं आपल्या आई-वडिलांची सेवा करावयाची म्हणजे एवढेंच कीं, त्यांच्या आज्ञेचा स्वीकार "ठीक आहे" अशा बहुमानानें करावयाचा.

**( २ ) पुत्राणां हि परो धर्मः पितृशुश्रूषणं सताम् ।** ६-७-२८
पितरांची सेवा करणें हाच सत्पुत्रांचा श्रेष्ठ धर्म होय.

**( ३ ) रामायण**—अयोध्याकाण्ड—अध्याय ३०, श्लोक ३३,३४
**अस्वाधीनं कथं दैवं प्रकारैरभिधीयते ॥**
**स्वाधीनं समतिक्रम्य मातरं पितरं गुरुम् ॥ २ ॥**

प्रभु रामचंद्र सीतेला म्हणतात—आपल्या स्वाधीन असलेल्या आईरूपी देवतेला, पितृरूपी देवतेला व गुरुरूपी देवतेला टाकून, स्वाधीन नसलेल्या दुसऱ्या दैवतांची आराधना नाना प्रकारांनीं कशी बरें करावी?

**( ४ ) नास्ति मातृसमाच्छाया, नास्ति मातृसमा गतिः ।**
**नास्ति मातृसमं त्राणं, नास्ति मातृसमा प्रिया ॥ ३ ॥**

आईसारखी सांवली नाहीं, आईसारखा आधार नाहीं, आईसारखें रक्षण नाहीं आणि आईसारखी प्रेमी नाहीं.

**( ५ ) न सुप्रतिकरं तत्तु मात्रा पित्रा च यत्कृतम् ।** २-१११-९.
आई-बापांनीं केलेले उपकार फिटणें कधींही शक्य नाहीं.

**( ६ ) उद्योगाभिहाचे पुत्रे जनयञ्जनको यथा ।**
**वित्तं रक्षंस्तदर्थं न तथा तस्योपकारकः ।**

**तुकाराम महाराज—**

**जननी हें जाणे बाळकाचें वर्म । सुख दुःख धर्म जें जें कांहीं ॥ १ ॥**
**लेंकरा आइतें पित्याचें जतन । द्यावी निजधन सर्व जोडी ॥ २ ॥**

**एकनाथ महाराज—**

**मातापिता देवगुरु । ऐसा ज्याचा एक विचारू ॥**
**धन्य धन्य तयाचें शरीर । नर नोहे तो ईश्वर ॥ ३ ॥**

## चांगल्या मित्रांचीच संगति धरा, चार खरे मित्र जाणावेत

( भगवान् बुद्ध )

**सिगालोवाद सूत्र**—(पाली ग्रंथ-दीघनिकाय, प्रकरण २१ ते २५) १ उपकार करणारा मित्र, २ सुखदुःखांत समान असणारा मित्र, ३ हिताचा उपदेश करणारा मित्र, ४ अनुकंपा करणारा मित्र, असे चार खरे मित्र जाणावेत.

**१ उपकार करणारा मित्र**—चार प्रकारांनीं जाणावा. ( १ ) आपण उन्मत्त झालों असतां मित्र आपलें रक्षण करतो. ( २ ) आपण उन्मत्त झालों असतां आपल्या संपत्तीचें मित्र रक्षण करतो. ( ३ ) आपण भ्यालों असतां आपणांस मित्र आश्रय देतो. ( ४ ) आपलें कांहीं काम निघालें असतां मित्र आपणांस दुप्पट संपत्ति देतो.

**२ समदुःखी समान मित्र**—( १ ) मित्र स्वतः आपली गुप्त गोष्ट मित्रास सांगतो. ( २ ) मित्र हा मित्राची गुप्त गोष्ट गुप्त राखतो. ( ३ ) मित्र हा आपत्तींत आपल्या मित्राला सोडून जात नाहीं. ( ४ ) मित्र हा आपल्या मित्रासाठीं प्राणही खर्ची घालतो.

**३ हितोपदेश करणारा मित्र**—( १ ) मित्र आपणांस पापापासून निवारण करतो. ( २ ) मित्र आपणांस पुण्यकर्मास प्रोत्साहन देतो. ( ३ ) मित्र हा जें आपण ऐकलें तें मित्रास सांगतो. ( ४ ) मित्र स्वर्गाचा मार्ग, सद्गतीचा मार्ग सांगतो.

**४ अनुकंपा मित्र**—( १ ) मित्राची हानि झाली असतां आनंद न होणारा. ( २ ) मित्राचें कल्याण झालें असतां आनंदी होणारा. ( ३ ) मित्राची निंदा करणाऱ्यास थांबविणारा. ( ४ ) मित्राची स्तुति चालली

असतां, स्तुति करणारा. वरील गुणांनीं युक्त अशा मित्रांची नेहमीं संगति धरावी, म्हणजे आपली उन्नति होते.

## ब्राह्मणांना व श्रमणांना मान कां द्यावा?

**मनुस्मृति–सर्वेषां ब्राह्मणो विद्यात् वृत्युपायान् यथाविधि ।**
**प्रब्रूयात् इतरेभ्यश्च स्वयं चैव तथाचरेत् ॥**

ब्राह्मणानें म्हणजे शिक्षकानें समाजाचें ज्ञानरूपी शरीर नेहमीं धष्ट-पुष्ट ठेविलें पाहिजे; विद्यार्थी, लहान-थोर, स्त्री-पुरुष, यांना सर्व प्रकारचें शिक्षण दिलें पाहिजे. हें गुरूचें काम ब्राह्मण वर्ग करतो व पूर्वीं त्यानें केलें, म्हणूनच तो श्रेष्ठ होय. ब्राह्मणानें सर्वांच्या उपजीविकेचे उपाय जाणावेत आणि ते त्यांना सांगावेत आणि स्वत: ते आचरावेत. तात्पर्य, अनेक कला व विद्या स्वत: शिकून, त्या त्या योग्य माणसांना विद्या व कला शिकवाव्यात. अनेक प्रकारच्या कलांचे शिक्षणक्रम तयार करून ते शिकवावेत. या कारणास्तव समाजानें ब्राह्मणांना म्हणजे शिक्षकवर्गाला नेहमीं फार मोठा मान दिला पाहिजे. त्यांचा गौरव केला पाहिजे.

**बुद्धकृत ब्राह्मणवर्णन—**

**न पसू ब्राह्मणानासुं, न हिरञ्ञं न धानियं ।**
**सज्झाय धनधञ्ञासुं, ब्रह्मनिधिभपालयुं ॥ १ ॥**
**फीता जनपदा रट्ठा ते नमस्सिसु ब्राह्मणे ।**
**अवज्झा ब्राह्मणा आसुं, अजेय्या धम्मरक्खिता ।**
**न ते कोचि निवारेसि कुलद्वारेसु सब्बसो ॥ २ ॥**

**सुत्तनिपात**—ब्राह्मणधम्मिकसुत्त. गाथा–२, ४, ५.

त्या ब्राह्मणांपाशीं पशू, धन, आणि धान्य नव्हतें. **स्वाध्याय** हेंच त्यांचें धन-धान्य होतें व ते ब्रह्मनिधीचें पालन करीत होते. सर्व राष्ट्रें ब्राह्मणांना पूजीत असत. ब्राह्मण अवध्य, अजिंक्य होते. कोणत्याही कुटुंबांत त्यांना मज्जाव नव्हता.

## अशोकाची चौथी राजाज्ञा

**पाली**–अतिक्रांतं अंतरं बहूनि वाससतानि वढिसो एव प्राणारंभो विहिंसा च भूतानं, ञातीसु असंप्रतिपती, ब्राह्मणस्रमणानं असंप्रतिपत्ती । त अज देवानं प्रियस प्रियदसिनो राञो धंमचरणेन भेरीघोसो अहो धंमघोसो, विमान दसणा, च

हस्तिदसणा च अगिखंधानि च अञानि च दिव्यानि रूपानि दसयित्वा जनं । यारिसे बहूहि वाससतेहि च भूतपुवे तारिसे अज वढिते देवानं प्रियस प्रियदसिनो राञो धंमानुसस्टिया अनारंभो प्राणानं । अविहीसा भूतानं, ञातीनं, संपटिपती, ब्राह्मणसमणानं संपटिपती. मातरि पितरि सुस्रूसा, थइरसुस्रूसा । एस अञे च बहुविधे धमचरणे वढिते पढयिसति चेव देवानं प्रियो प्रियदसी राजा धंमचरणं इदं । पुत्रा च पोत्रा च प्रपोत्रा च देवानं प्रियस प्रियदसिनो राञो वढयिसंति इदं धंमचरणं आव संवटकपा । धर्मम्हि सीलम्हि तिस्टन्तो धंमं अनुसासिसन्ति । एसहि सेस्टे कंमे य धमानुसासनं । धमचरणेऽपि न भवति असीलस । इमम्हि अथम्हि वढी च अहीनी च साधु । एताय अथाय इदं लेखापितं इमस अथस वढी युजंतु हीनि च मा लोचेतव्या द्वादसवसाभिसितेन देवानं प्रियेन प्रियदसिना राञा इदं लेखापितं ।

**पूर्वीपासून शेकडों वर्षें प्राण्यांची हत्या जास्तींत जास्त वाढत आली आहे. नातेवाईक, ब्राह्मण आणि श्रमण यांच्याशीं जनतेची वागणूक जास्तींत जास्त वाईट झाली होती. परंतु आतां देवानांप्रिय प्रियदर्शी राजाच्या धर्माचरणामुळें पूर्वीच्या काळीं जनतेला युद्धाची बातमी देण्यासाठीं वाजविले जाणारे नगारे, आतां जनतेनें विमानें, हत्ती, दिव्य-कांतीचे देव, वगैरेंचे दैवी देखावे पाहण्यास जमावें, यासाठीं नगारे बाजावेले जात आहेत. देवानांप्रिय प्रियदर्शी राजानें दिलेल्या धर्माच्या शिक्षणाचा परिणाम असा झाला आहे कीं, गेल्या शेकडों वर्षांत दिसून आली नव्हती इतकी प्राण्यांची हिंसा घडण्याचें प्रमाण कमी झालें. तसेंच ब्राह्मण, श्रमण, आणि नातेवाईक, यांच्याशीं होणारी जनतेची वागणूक आतां सुधारली आहे. आई-वडिलांची सेवा व म्हाताऱ्या माणसांची सेवा, जनता जास्तींत जास्त करूं लागली आहे. अशा व दुसऱ्याही अनेक प्रकारांनीं धर्माचें आचरण वाढलें आहे. देवानांप्रिय प्रियदर्शी राजा तें धर्माचरण आणखीही वाढावें म्हणून सारखा प्रयत्न करीत राहील, आणि देवानांप्रिय प्रियदर्शी राजाचा मुलगा, नातू, आणि पणतू युगाचा शेवट होईपर्यंत धर्माचरणाची वाढ व्हावी म्हणून प्रयत्न करतील; तसेंच स्वतः धर्माचें आचरण करून आणि सद्गुणी बनून जनतेला धर्माचरणाचें शिक्षण देतील. धर्माचा उपदेश करणें हें श्रेष्ठ प्रतीचें काम आहे. शीलवान् नसलेल्याला धर्माचरण करतां येणार नाहीं. धर्माचरणादि गुणांची वाढ व्हावी, त्यांत खंड पडूं नये, हें चांगलें. राज्याभिषेकानंतर बाराव्या वर्षी देवान प्रिय प्रियदर्शी राजानें हा लेख लिहविला आहे.**

## सम्राट् अशोकाचा आशावाद

**स्पष्टीकरण**-- १. यज्ञयागांतील प्राण्यांची अतिरेकी हत्या सम्राट् अशोकाच्या पहिल्या राजाज्ञेमुळें बऱ्याच प्रमाणांत कमी झाली व नातेवाइकांशीं फटकून वागणें, ब्राह्मण व श्रमण यांना मान न देणें, हे जनतेचे दोष राजाज्ञेच्या प्रचारानें बरेचसे कमी झाले. जनता नीतीच्या व आपल्या हिताच्या मार्गाला लागली; याबद्दल अशोकानें या राजाज्ञेंत एक प्रकारचा जनता सुधारण्याचा आशावाद दाखविला आहे. २. जनतेनें पापभीरु व्हावें, चोरी, दरोडे, खून आणि परस्त्रियांवर बलात्कार, लोकांना फसविणें हीं पापें केल्यास या पापांचे भयंकर परिणाम नरक लोकांत त्यांना भोगावे लागतील, दुःखाचा सारखा अनुभव कसा घ्यावा लागतो, वगैरे यमपुरींतील देखावे, दाखविले जात असत. तसेंच जीं माणसें शरीरानें, वाणीनें व मनानें कोणतींही पातकें न करतां, नेहमीं हस्तें परहस्तें दुसऱ्यांच्या उपयोगी पडतात, नेहमीं खरें बोलतात, चहाडी करीत नाहींत, कठोर न बोलतां, गोड बोलतात, अशा सज्जन माणसांना इहलोकीं व परलोकीं कसें सुख मिळतें व त्यांना आनंद कसा मिळतो, ह्या गोष्टी, दैवी देखावे, नाटकें, तमाशे आणि निरनिराळ्या उत्सवांच्या वेळीं होणारीं ललितें यांच्या द्वारें जनतेला दाखविल्या जात होत्या, त्याचा जनतेच्या मनावर चांगला परिणाम होऊं लागला होता. जनता पापें करण्याला भिऊं लागली होती. जनता पुण्यकर्में करण्याकडे प्रवृत्त झाली होती. ह्या राजाज्ञेंत अशोकानें आपले नातू-पणतू यांनीं कर्तव्य, नीति, सदाचार, या धर्माचें आचरण प्रथम स्वतः करून, नंतर आपल्या जनतेलाही त्याचें शिक्षण द्यावें; धर्माचरण जनतेच्या हातून घडविण्याचा त्यांनीं नेहमीं प्रयत्न करावा, हा आशावाद प्रगट केला आहे.

## अशोकाची पांचवी राजाज्ञा

**पाली**-देवानं प्रियो प्रियदसिराजा एवं आह--कलाणं दुकरं। यो अदिकरे कलाणस सो दुकरं करोति। त मया बहु कलाणं कतं। त मम पुता च पोतो च परं च तेन य मे अपचं आव संवटकपा अनुवतिसरे तथा सो सुकतं कासति। यो तु एत देसंऽपि हापेसति सो दुकतं कासति; सुकरं हि पापं। अतिकातं अंतरं न भूतपूर्व धंममहामाता नाम। त मया तेदसवासाभिसितेन धममहामाता कता।

ते सव पासंडेसु व्यापता धंमाधिस्टानाय च धंमवढिया च हितसुखाय च धंमयुतस च योनकंबोजगंधारान रस्टिकपेते निकानं ये वाऽपि अंञे अपरता भटमयेसु ब्रमणिभेसु अनथेसु वुढेसु हितसुखाये धमयुताये अपलिबोधाये व्यापटा । ते बंधनबधस पटिविधनाये अपलिबोधाये मोखाये च इयं अनुबधपजऽति वा कटाभिकारऽति वा महलकेऽति वा व्यापटा । ते हिदं बाहिरेसु च नगरेसु सवेसु ओरोधनेसु भातिनं च मे भगिनिनं ये वाऽपि अंञे आतिके सर्वत्र व्यापटा । यो इयं धंमनिस्रितोऽति वा धंमधिथानेऽति वा दानसंयुतोऽति वा सर्वत्र विजितसि मम धंमयुतसि व्यापटा ते धंममहामाता । एताये इयं अथाये धंमलिपि लेखिता चिरठितिका होतु, तथा च मे पजा अनुवटतु ।

## धर्ममहामात्रांची नेमणूक

देवानांप्रिय प्रियदर्शी राजा असें म्हणाला कीं – कल्याणकारक कृत्य करणें, फार कठीण आहे. जो कल्याणकारक कृत्याला आरंभ करतो तो करण्यास कठीण अशी गोष्ट करतो. माझ्याकडून पुष्कळ कल्याणकारक कृत्यें पूर्वी केलीं गेलीं आहेत. तरी पण माझे पुत्र आणि नातू, कल्पाचा अंत होईपर्यंत माझें अनुकरण करतील; तर तें चांगलें कृत्य किंवा पुण्यकृत्य केलेले असे होतील. जो त्या पुण्यकृत्यांपैकीं एखादा भाग करावयाचा सोडील, तर तसें तें करणें वाईट कृत्य केल्यासारखें होईल.

पाप करणें हें फार सोपें आहे. शेंकडों वर्षांपूर्वी धर्ममहामात्र नव्हते. मी राज्याभिषेक झाल्यानंतर तेराव्या वर्षी धर्ममहामात्र नेमले आहेत. ते धर्ममहामात्र, सर्व पंथांच्या लोकांच्या ठिकाणीं धर्माची स्थापना करण्याकरितां, आणि धर्माची वाढ करण्याकरितां, त्यांच्या हितासाठीं, सुखासाठीं मी नेमले आहेत.

यवन, कांबोज, गांधार, राष्ट्रीक आणि अपरान्त ह्या सर्व प्रांतांत मी धर्ममहामात्रांची नेमणूक केली आहे. तेथील ब्राह्मण, अनाथ, वृद्ध, यांच्या हितासाठीं, सुखासाठीं ते झटतील. धर्मशील लोकांना कोणतीही पीडा होणार नाहीं, अशी काळजी घेतील. लोकांची काळजी ते वाहतील. मुलेंबाळें फार असणारांना ते द्रव्याची मदत करतील. शिक्षा झाल्यामुळें शृंखला हातीं पडलेल्यांना जर कांहीं आपत्ती-त्रास झाला, तर त्यांच्या शृंखला काढावयास लावतील, गुन्हेगाराचें वय पाहून वाटल्यास त्यांना सोडूनही देतील. नगरांत, नगराच्याबाहेर, माझ्या जनानखान्यांत तसेंच माझ्या भाऊबंदांत, बहिणी वगैरे जवळच्या नातेवाइकांत सर्व ठिकाणीं धर्ममहामात्रांची नेमणूक केली आहे. धार्मिक, आणि दानशूर,

**अशा सर्वांशीं हे धर्ममात्र संबंध ठेवतील. हा धर्मलेख चिरकाल राहो, त्याप्रमाणें माझी प्रजा वागो, यासाठीं लिहविला आहे.**

## धर्ममहामात्रांची नेमणूक

**सदाचार** हा बौद्ध धर्माचा पाया आहे. हा सदाचार ऊर्फ **शील** उत्तम राखण्यास समाजांतील लहान-थोर सर्व स्त्री-पुरुषांनीं व्यक्तिशः रात्रंदिवस झटलें पाहिजे. तसेंच **शीलभ्रष्ट माणसें शीलवान् कशीं होतील**, असा प्रयत्नही समाजांतील विद्वान्, समाजसुधारक, साधुसंत आणि पुढारी, यांच्या साहाय्यानें धर्ममहामात्रांनीं केला पाहिजे. प्रथम आपला गांव, आपला प्रांत, आपलें राष्ट्र आणि नंतर एकंदर जग सदाचारी बनावें, याविषयींही आपलीं कांहीं कर्तव्यें आहेत असें दिसून येईल. तीं कर्तव्यें योग्य रीतीनें प्रत्येक स्त्रीपुरुषानें न चुकतां बजावल्यास, आपलें स्वतःचें कल्याण होईल आणि त्यामुळें इतर आपल्या सर्व बांधवांचेंही कल्याण होईल. असा सम्राट् अशोकाचा मुख्य उपदेश आहे. धर्ममहामात्रांनीं समाजाला आपला धर्म म्हणजे आपलीं त्या त्या अवस्थेंतील, त्या त्या पेशांतील म्हणजे शिक्षक, डॉक्टर, वकील, नोकर, पोलीस, दुकानदार, गवळी यांनीं रोजचीं कर्तव्यें, कामें, सदाचारानें, नीतीनें पाळलीं पाहिजेत हा उपदेश करावयाचा आहे. सर्व समाजाचे निरनिराळे प्रश्न सोडविण्याकडे लक्ष देणें, ही कामगिरी होती. ती त्यांनीं पाळली होती. आजही भारत सरकार व प्रांताचें सरकार, यांनीं **धर्ममहामात्र** नेमणें अत्यंत आवश्यक आहे. तसें झाल्यास गुन्हेगार व त्यांचे गुन्हे शोधण्यासाठीं सरकारचे जे कोट्यवधि रुपये दरवर्षी खर्च होतात ते थांबतील. समाजांत नेहमीं स्वार्थासाठीं खून, मारामाऱ्या, शिवीगाळ, खोटे फसवणुकीचे व्यवहार, न्यायालयांत येणारे वेडेवाकडे हजारो गुन्हे व त्यासंबंधीं खटले थोड्याबहुत प्रमाणांत कमी होतील.

**तीन दुश्चरितें:—१ कायदुश्चरित**—शरीरानें वाईट आचरण, **२ वाचादुश्चरित**—खोटें बोलणें, चहाडी, कठोर भाषण, **३ मनोदुश्चरित**—मनानें सर्व प्रकारचीं पापें चिंतणें. ( १ ) **दुश्चरितें** म्हणजे वाईट गोष्टी आपण स्वतः करूं नयेत. ( २ ) दुश्चरितें म्हणजे वाईट गोष्टी दुसऱ्याकडून करवूं नयेत. ( ३ ) दुश्चरितें म्हणजे वाईट गोष्टी करणाऱ्या व्यक्तीला केव्हांही संमति देऊं नये. **तीन सुचरितें:—१ कायसुचरित**-शरीरानें

दुसऱ्याच्या चांगल्या कामांत नेहमी उपयोगी पडणें. **वाचासुचरित**–खरें बोलणें, गोड बोलणें. **मनोसुचरित**–मनानें नेहमी सर्वांबद्दल चांगली भावना ठेवणें, **सुचरितें**–म्हणजे शरीर, वाणी आणि मन--यांच्याद्वारें चांगल्या गोष्टी करणें, सर्वांचें भलें करणें. ( २ ) चांगल्या गोष्टीच दुसऱ्याकडून करवून घेणें. ( ३ ) चांगल्या गोष्टी करणाऱ्या व्यक्तीला नेहमी हस्तें परहस्तें प्रोत्साहन देणें.

## दुःशील माणसास शीलविपत्तीमुळें पांच तोटे आहेत
### **दीघनिकाय**—महापरिनिर्वाणसूत्र-२३, २४

भगवान् बुद्धांनीं पाटली ग्रामांतील उपासकांना दुःशील माणसास शीलविपत्तीमुळें पांच तोटे आहेत व शीलवंत माणसास शीलसंपत्तीमुळें पांच फायदे आहेत याबद्दल उपदेश केला.

हे गृहपतींनो, दुःशील माणसाचे शीलविपत्ती ( शीलभ्रष्टता ) मुळें पांच तोटे आहेत. १ दुःशील माणसाची निष्काळजीपणामुळें संपत्तीची फार मोठी हानी होते. २ दुःशील माणसाची चोहोंकडे अपकीर्ति पसरते. ३ दुःशील माणसाला कोणत्याही सभेंत किंवा समाजांत जाण्याचा प्रसंग आल्यास त्याला घाबरून, लाजेनें खालीं तोंड घालून जावें लागतें. ४ दुःशील माणूस संमूढ होऊन मरतो. ५ दुःशील माणसाला मरणानंतर वाईट गति व **नरकलोक मिळतो.**

## शीलवंत माणसाचे शीलरूपी संपत्तीमुळें पांच फायदे होतात.

१ शीलवंत माणसाला सर्व बाबतींत काळजी घेतल्यानें मोठी संपत्ति मिळते. २ शीलवंत माणसाची नेहमी सर्व ठिकाणीं कीर्ति पसरते. ३ शीलवंत माणूस कोणत्याही सभेंत गेला तर तो उजळ माथ्यानें कोणास न घाबरतां तेथें जातो. ४ शीलवंत माणूस असंमूढ, आनंदी-स्थितींत मरण पावतो. ५ शीलवंत माणसाला मरणानंतर उत्तम लोक मिळतो. सर्व जनतेनें दुःशीलाचा मार्ग सोडून शीलवंताचाच मार्ग पत्करावा. त्यांतच जनतेचें कल्याण आहे.

गुन्हेगार कायद्याच्या वडग्यानें जसा गुन्हे करण्यास भितो, तसा तो नीतिविषयक ग्रंथाच्या वाचनानें, दुसऱ्यानें आपला गुन्हा केला, आपलें नुकसान केलें, म्हणजे जसें आपणांस वाईट वाटतें, तसेंच दुसऱ्याबद्दल आपण खून, चोरी, परस्त्रीगमन केलें व करविलें, संमति दिली तर, दुसऱ्यासही फार वाईट वाटतें म्हणून " आपल्यावरून दुसऱ्याचा विचार करणें." ह्या उपदेशानें, नीतिमान माणसांच्या सदाचारानें व सहवासानें गुन्हेगार गुन्हे करण्यास प्रवृत्त होणार नाहीं, असाच प्रयत्न धर्मोपदेश करणाऱ्या धर्ममहामात्रांचे द्वारें होणें आवश्यक आहे.

## संसारी माणसांना भगवान् बुद्धाचा उत्कृष्ट व उन्नतिकारक असा धर्मोपदेश ( दीघनिकाय )

**सिगालगृहपतिपुत्र** म्हणतो–हे भगवान्, आपण मला आर्यधर्माप्रमाणें सहा दिशांची पूजा कशी करावी हा उपदेश करावा.

**भगवान् बुद्ध**–हे सिगालगृहपतिपुत्रा, तूं यापूर्वी ओल्या वस्त्रानें व ओल्या केसानें हात जोडून, दिशावंदन करीत होतास, तें बरोबर नाहीं. आर्यश्रावक सहा दिशांची पूजा पुढीलप्रमाणें करतो:--१ आपले जन्मदाते व संगोपन करणारे **आई-बाप यांना पूर्व दिशा** समजावी. २ आपलें ज्ञानरूपी शरीर धष्टपुष्ट करणाऱ्या **गुरुदेवांना दक्षिण दिशा** समजावी. ३ आपल्या संसाराची जबाबदारी पत्करलेली आपली **पत्नी** व आपले कुलदीपक **मुलगे** आणि आपल्या **मुली**, यांना **पश्चिम दिशा** समजावी. ४ आपले जवळचे व लांबचे **नातेवाईक**, यांना **उत्तर दिशा** समजावी. ५ आपलीं मनोभावें नेहमीं कामें करणारे आणि सेवा करणारे **नोकर** (सेवक, दास), यांना **खालची दिशा** ( अधरा दिशा ) समजावी ६ **श्रमण** व **ब्राह्मण**, यांना **वरची दिशा** ( ऊर्ध्वा दिशा ) समजावी.

### १ मुलानें आई व वडील यांची पूजा पांच प्रकारांनीं करावी.

१ प्रत्येक मुलामुलीनें आपल्या जन्मदात्या आई-वडिलांनीं आपलें पालन-पोषण केलें आहे, म्हणून पुढील प्रतिज्ञा कराव्या. मी त्यांचें वृद्धापकाळीं पोषण करीन. २ मी आई-वडिलांचें काम करीन. नेहमी त्यांची सेवा

करीन. ३ मी आई-वडिलांचा कुळाचार चालू ठेवीन. मी आई-वडिलांच्या संपत्तीचा ( धनसंपत्ति-गुणरूपसंपत्ति ) वांटेकरी होईन. ५ मी माझे आई-वडील, यांच्या मरणानंतर त्यांच्या नांवें दक्षिणा देईन, देणग्या देईन. अशा पांच प्रतिज्ञा मुलांमुलींनीं घेऊन, मातृपूजा, पितृपूजा, करावी. त्यामुळें मुलांमुलींचें नेहमीं कल्याण होईल. पुढीलप्रमाणें आई-वडील पांच प्रकारांनीं कृपा करतात.

## आई व वडील हे मुलांवर पांच प्रकारांनीं कृपा करतात

१ आई व वडील आपल्या मुलांना पापकर्मापासून [ म्हणजे मुलांच्याकडून शरीर, वाणी, मन, यांच्या द्वारें घडणाऱ्या पापापासून ] निवृत्त करतात. २ मुलांना कल्याणकारक मार्गास लावतात आणि कला शिकवितात. ३ योग्य वेळीं योग्य स्त्रीशीं मुलाचा विवाह करून देतात व योग्य वेळीं आणि योग्य पतीशीं मुलीचें लग्न करून देतात. ५ योग्य वेळीं आपली मालमत्ता मुलांच्या व मुलींच्या ताब्यांत देतात.

याप्रमाणें आई-वडीलरूपीं पूर्व दिशेची प्रत्येक मुलामुलीनें पूजा करावी. त्यामुळें पितापुत्रांचे संबंध नेहमीं उत्कृष्ट रहातील.

## २ शिष्यानें गुरुदेवांची पांच प्रकारांनीं पूजा करावी

१ शिष्यानें आपणांस ज्ञानदान करणाऱ्या आपल्या गुरुदेवांचा नेहमीं आदरसत्कार करावा. २ शिष्यानें आपल्या गुरुदेवांची नेहमीं सेवा करावी. ३ शिष्यानें आपल्या गुरुदेवांचा उपदेश, हितकारक गोष्टी आणि ज्ञानासंबंधीं आचारविचार नेहमीं श्रद्धापूर्वक ऐकावा. ४ शिष्यानें आपल्या गुरुदेवांचीं कामें करावींत. ५ शिष्यानें आपल्या गुरुदेवांचेकडून नेहमीं आदरपूर्वक विद्या शिकावी; म्हणजे आपले गुरुदेव पुढील पांच प्रकारांनीं शिष्यावर कृपा करतात :—

## गुरुदेव पांच प्रकारांनीं शिष्यावर कृपा करतात

१ गुरुदेव आपल्या शिष्यांना चांगला आचार ( कोणाशीं कोठें सभ्यपणानें कसें वागावें, हा आचार) शिकवितात. २ गुरुदेव आपल्या शिष्यांना चांगल्या रीतीनें कलाकौशल्य शिकवितात. ३ गुरुदेव आपल्या शिष्यांना सर्व प्रकारचें ज्ञान उत्तम रीतीनें देतात. ४ गुरुदेव आप्त-मित्रांत आपल्या शिष्यांची

स्तुति करतात. ५ गुरुदेव शिष्यांचें कोठेंही रक्षण करतात. याप्रमाणें शिष्यानें गुरुरूपी दक्षिण दिशेची पूजा करावी. त्यामुळें गुरुशिष्यांचे संबंध नेहमीं उत्कृष्ट राहातील. तात्पर्य गुरुश्रद्धा व शिष्यप्रेम पाहिजे.

## ३ नवऱ्यानें पत्नीची पांच प्रकारांनीं पूजा करावी

१ नवऱ्यानें आपल्या पत्नीला नेहमीं मान द्यावा. २ नवऱ्यानें आपल्या पत्नीचा केव्हांही अपमान करूं नये. ३ नवऱ्यानें कधींही व्यभिचार (परस्त्रीगमन) करूं नये. ४ नवऱ्यानें आपल्या पत्नीला ऐश्वर्यादि संपति द्यावी. ५ नवऱ्यानें पत्नीला दागिने द्यावेत; म्हणजे आपली पत्नी पुढील पांच प्रकारांनीं आपल्या पतीवर कृपा करते व आपलें उत्कृष्ट कर्तव्य बजावते.

## पत्नी पांच प्रकारांनीं पतीची सेवा करते

१ पत्नी नेहमी आपलीं कामें नीट करते. २ पत्नी नेहमी आपल्या पतीच्या नोकरांना नीट संभाळते व त्यांना चांगली वागवते. ३ पत्नी जन्मभर पतिव्रता रहाते. ४ पत्नी पतीच्या संपत्तीचें रक्षण करते. ५ पत्नी नेहमी उद्योगी आणि कामांत दक्ष रहाते. याप्रमाणें दोघे पतिपत्नी वागल्यास संसार सुखाचा व नमुनेदार होतो. याप्रमाणें नवऱ्यानें पत्नीरूपी पश्चिम दिशेची पूजा नेहमी करावी, म्हणजे पतीचें जीवन सुखी होईल.

## ४ व्यक्तीनें आपले नातवाईक व मित्र यांची पांच प्रकारानें पूजा करावी

१ प्रत्येक व्यक्तीनें नेहमीं आपल्या नातेवाइकांना व मित्रांना हस्तें परहस्तें प्रत्येक बाबतींत मदत करावी. २ प्रत्येक व्यक्तीनें नेहमीं आपल्या नातेवाइकांशीं व मित्रांशीं गोड बोलावें. ३ नातेवाइकांचीं व मित्रांचीं हस्तें-परहस्तें नेहमीं कामें करावींत. ४ आपणांसारखी त्यांना वागणूक द्यावी व समानतेनें वागवावें. ५ नातेवाइकांशीं कधींही भांडूं नये; म्हणजे नातेवाईक व मित्र त्या व्यक्तीवर पुढील पांच प्रकारांनीं कृपा करतात.

## नातेवाईक व मित्र आपल्यावर पांच प्रकारांनीं कृपा करतात

१ आपण उन्मत्त झालों असतां नातेवाईक व मित्र आपलें रक्षण करतात. २ आपल्या संपत्तीचें ते रक्षण करतात. ३ भीतीच्या वेळीं नेहमी

नातेवाईक व मित्र आपणांस आश्रय देतात. ४ आपल्या आपत्तीमध्यें आपले नातेवाईक व मित्र आपणांस सोडून जात नाहींत. ५ आपल्या संततीवर आपले नातेवाईक व मित्र नेहमीं उपकार करतात. नातेवाइकांशीं व मित्रांशीं नेहमी आपण चांगलें वागलों, म्हणजे तेही आपणांशीं नेहमीं गुण्यागोविंदानें वागतात. याप्रमाणें नातेवाईकरूपी उत्तर दिशा पुजावी.

## मालकानें आपल्या नोकरांची पांच प्रकारांनीं काळजी घ्यावी

१ मालकानें नेहमीं आपल्या नोकराला त्याच्या शक्तीच्या व बुद्धीच्या सामर्थ्याप्रमाणें पेलेल असें काम सांगावें. २ मालकानें आपल्या नोकराला नेहमीं योग्य अन्नवस्त्र व योग्य पगार द्यावा. ३ मालकानें आपला नोकर आजारी पडला, तर त्याची सेवा करावी. ४ मालकानें आपल्या नोकरांना सण, उत्सव वगैरे प्रसंगीं उत्तम भोजनाचा वांटा द्यावा. ५ मालकानें आपल्या नोकराला नेहमीं उत्तम कामाबद्दल योग्य बक्षीस द्यावें व शाबासकी द्यावी; म्हणजे नोकरही मालकाची पुढील पांच प्रकारांनीं सेवा करतात व मालकाबद्दल कृतज्ञ राहातात.

## नोकर आपल्या मालकाची पांच प्रकारांनीं पूजा करतात

१ मालकाच्या आधीं नोकर उठतात. २ मालकाच्या मागून नोकर झोंपी जातात. ३ नोकर मालकाची किंवा इतर कोणाचीही चोरी करीत नाहींत. ४ नोकर नेहमी आपल्या मालकाचें उत्तम तऱ्हेनें काम करतात. ५ नोकर मालकाची कीर्ति पसरवितात. याप्रमाणें मालकानें दास-नोकररूपी खालच्या दिशेची पूजा केल्यास, त्याचे सर्व व्यवहार नेहमीं उत्कृष्टपणें चालतील.

## ६ श्रमण व ब्राह्मण यांची पांच प्रकारांनीं पूजा करावी

**श्रमण** म्हणजे ज्यानें घर सोडून प्रव्रज्या ( संन्यासदीक्षा ) घेतली आहे त्यास **श्रमण** किंवा **परिव्राजक** म्हणतात. बौद्धकालीं सर्व धर्मपंथांत असे श्रमण होते. ते संन्यासी आपआपल्या धर्माचा नेहमी उपदेश व प्रचार करीत असत. या कार्याबद्दल गृहस्थ लोक त्यांना अन्नदान, वस्त्रदान देत असत, त्यांना राहाण्यास जागा देत असत, त्यांचें रक्षण करीत असत. आजही हिंदुस्थानांत कमी-अधिक प्रमाणांत धर्मोपदेशक संन्यासी,

किंवा ब्रह्मचारी श्रमण आहेत. ते यथाशक्ति, यथामति, यथाकाल, धर्मप्रचार करीत आहेत. परंतु तेवढ्यानें काम होत नाहीं. कालमानाप्रमाणें त्यांनीं खोटे आचार, खोटे विचार, तशाच खोट्या रूढी, सोडून समाजाच्या उन्नतीचेच नवे विचार व नवे आचार घेतले पाहिजेत. अर्थकरी विद्या-पैसा मिळवून देणारी विद्या म्हणजे उद्योगधंद्याचे शिक्षणाकडे यापुढें पालक व विद्यार्थी यांचें मन वळविलें तरच श्रमण-ब्राह्मण, यांचा सत्कार समाज करील. ब्राह्मणवर्ग पूर्वी शिक्षकाचें काम करीत होता म्हणूनच "**वर्णानां ब्राह्मणो गुरुः**" हें मानाचें स्थान ब्राह्मणांना मिळालें. १ प्रत्येक व्यक्तीनें श्रमण व ब्राह्मण, यांना मैत्रीयुक्त भावना ठेवून, शरीरानें मदत करावी. २ प्रत्येक व्यक्तीनें मैत्रीयुक्त भावनेनें श्रमण-ब्राह्मण यांच्याशीं भाषण करावें. ३ मैत्रीयुक्त मनानें श्रमण-ब्राह्मणांबद्दल वृत्ति ठेवावी. ४ मैत्रीयुक्त भावनेनें श्रमण-ब्राह्मण, यांना अन्नदान-वस्त्रदान, वगैरेंची मदत करून, प्रोत्साहन द्यावें. पूर्वीच्या काळीं श्रमण व ब्राह्मण हे लोक समाजसेवेचें, आणि जीवनोपयोगी व नीतिवर्धक अशा शिक्षणाचें कार्य करीत असत, म्हणून त्यांना गृहस्थाश्रमी सर्व लोकांनीं व राजांनीं यथाशक्ति मदत करण्याची पद्धति होती. त्या पद्धतीचें रक्षण आजही झालें पाहिजे.

## श्रमण व ब्राह्मण कुलपुत्रांवर पांच प्रकारांनीं कृपा करतात

१ श्रमण व ब्राह्मण हे आपली पूजा करणाऱ्या कुलपुत्राला पापकर्मापासून निवृत्त करतात. २ कल्याणकारक मार्गाला लावतात. ३ कुलपुत्रांवर कृपा करतात. ४ न ऐकलेल्या उत्कृष्ट गोष्टी ऐकवितात. ५ त्याच ज्ञान शुद्ध करतात [ वेड्यावांकड्या समजुती]. याप्रमाणें श्रमण-ब्राह्मण, या **ऊर्ध्व-दिशेची** (वरच्या दिशेची) पूजा केली असतां, व्यक्तीचें जीवन नेहमी सुखी होतें.

## श्रमण व ब्राह्मण समाजकैवारी होते

**समाजाचा कैवारी**—गरीब लोकांच्या अंगीं आळस, अज्ञान, धर्माविषयीं खोटया समजुती, रेस, दारू, सट्टा, परस्त्रीगमन, चोरीच्या कामाला हस्तें परहस्तें मदत, पैशासाठीं सर्व गुन्हे व पातकें करण्याची प्रवृत्ति, हे दुर्गुण त्यांचे वाईट परिणाम दाखवून उद्योगीवृत्ति, उद्योगाचें घरी ऋद्धिसिद्धि पाणी

भरी ' हें पटविणें बुद्धिर्ज्ञानेन शुध्यति हा उपदेश, 'परोपकारः पुण्याय पापाय परपीडनम् ' हे सद्गुण वाढीस कसे लागतील हा प्रयत्न जो करील तोच खरा गरिबांचा कैवारी व तोच समाजसेवक.

## समाजांत आठ प्रकारच्या व्यक्ति असतात. माणसानें कोणत्याही कामांत स्वतःला व दुसऱ्याला ताप देऊं नये

१ **आत्मंतप**—म्हणजे कोणत्याही कामांत स्वतःस ताप करून घेणारी व्यक्ति.

२ **परंतप**—म्हणजे कोणत्याही कामांत व दुसऱ्याला ताप देणारा.

३ **आत्मंतप, परंतप**—म्हणजे कोणत्याहि कामांत स्वतःला व दुसऱ्याला ताप करून देणारा.

४ **आत्मंतप न परंतप**—म्हणजे कोणत्याही कामांत स्वतःलाही ताप नाहीं व दुसऱ्यालाही ताप नाहीं.

### व्यक्तीनें आत्महित व परहित पहावें.

५ एखादी व्यक्ति फक्त **आत्महित पहाते** परंतु **परहित पहात नाहीं.**

६ एखादी व्यक्ति फक्त **परहित पहाते** परंतु **आत्महित पहात नाहीं.**

७ एखादी व्यक्ति **आत्महितही पहात नाहीं व परहितही पहात नाहीं.**

८ एकादी **व्यक्ति आत्महितही पहाते व परहितही पहाते. तात्पर्य-समाजांतील प्रत्येक व्यक्तीनें नेहमीं आत्महित व परहित साधावें.**

**विशेष** : वरील वर्णनांतल्या आठ व्यक्तींपैकीं चौथी व आठवी व्यक्ति प्रत्येकानें बनलें पाहिजे. **दीर्घनिकाय संगीतिसुत्त—४७-४८**

## अशोकाची सहावी राजाज्ञा

**पाली**—देवानं प्रियो प्रियदसि राजा एवं आह—अतिकंतं अंतरं न भूतपूर्वं सवकालं अथकं मे वा पटिवेदना वा । त मया एवं कतं—सवे काले भुंजमानस मे,

ओरोधनम्हि, गभागारम्हि, वचम्हि, य विनीतम्हि च उयानेसु च सर्वत्र प्रति-वेदका, स्टिता अथे मे जनस पटिवेदेथ इति। सर्वत्र च जनस अथे करोमि, य च किंचि मुखतो आणपयामि, स्वय दापकं वा स्रावापकं वा य वा पुन महामात्रेसु आचयिक आरोपितं भवति, ताय अथाय विवादो निझति व संतो परिसायं अनंतरं पटिवेदेतव्यं मे सर्वत्र सर्वे काले-एव मया आणापितं। नास्ति हि मे तोसो उस्टानम्हि अथसंतीरणाय वा। कतव्यमते हि मे सर्व लोकहितं। तस च एसमूले उस्टानं च अथसंतीरणा च। नास्ति हि कंमतरं सर्वलोकहितेन। य च किं चि पराक्रमामि अहं, किंति भूतानं अनंणं गच्छेयं, इध च नानि सुखोपयामि परत्र च स्वगं आराधयंतु। न एताय अथाय अयं धंमलिपि लेखापिता किंति चिरं तिस्टेय इति, तथा च मे पुत्रा पोता च प्रपोत्रा च परक्रमंतु सवलोकहिताय, दुकरं तु इद अञत्र अगेन पराक्रमेन।

## राजदूतांनीं राज्यकारभाराच्या बातम्या मला केव्हांही सांगाव्यात

देवानां प्रिय प्रियदर्शी राजा असें म्हणाला कीं-पूर्वी राजदूतांकडून राज्यकारभाराच्या बातम्या ऐकून घेण्याच्या वेळा ठरलेल्या होत्या. परंतु आतां मी असें केलें आहे कीं, सर्वकाळीं म्हणजे मी जेवीत असतांना, मी जनानखान्यांत असतांना, मी शय्यागृहांत असतांना, मी अश्वशाळेंत असतांना, मी बागेंत असतांना, किंवा मी जेथें असेन तेथें, राजदूतांनीं माझ्यापुढें जनतेच्या गाऱ्हाण्यीं, कारभार, ठेवावा. मी जेथें असेन तेथें जनतेच्या गाऱ्हाण्यांचा विचार करीन. मी तोंडीं दिलेल्या एखाद्या आज्ञे-बद्दल किंवा महामात्रांच्यापुढें आलेल्या एखाद्या तांतडीच्या कामांत जर मंत्रिमंडळांत मतभेद झाला, तर अशा बाबतींत मी आज्ञा केली आहे कीं कोणत्याही वेळीं, मला कोठेंही त्या बातम्या कळवाव्यात, मी कितीही श्रम केले किंवा कामाचा उरक केला तरी मला संतोष नाहीं. सर्व लोकांचें हित मला केलें पाहिजे. हें माझें मी श्रेष्ठ कर्तव्य मानतों. हेंच माझ्या श्रमाचें व कामाच्या उरकाचें मूळ आहे. सर्व लोकांच्या हिता-पेक्षां मला दुसरें कांहीं कर्तव्य नाहीं. जो कांहीं मी पराक्रम करीत आहे त्यामुळें मला प्राणिमात्रांच्या ऋणांतून मुक्त होतां यावें, हें मी इच्छितों. प्राणिमात्रांना इहलोकीं मी सुखी करवीन व परलोकींही त्यांना स्वर्ग मिळावा हें इच्छितों. त्यासाठीं मी हा धर्मलेख लिहविला आहे. तो चिरकाल टिकावा. त्याप्रमाणें माझे मुलगे, नातू आणि पणतू, सर्व लोकांच्या

**हितासाठीं पराक्रम करोत, यत्न करोत. ही गोष्ट अत्यंत पराक्रमाशिवाय ( प्रयत्नाशिवाय ) साधणार नाहीं.**

**स्पष्टीकरण—**प्रजेचीं गाऱ्हाणीं राजदूतांच्याकडून केव्हांही कोठेंही मी ऐकून घेईन. त्याला वेळेचें, काळाचें व ठिकाणाचें बंधन नाहीं. सर्व लोकांचें हित पहाणें, सर्व प्राणिमात्रांचें हित पहाणें, हें सम्राट् अशोकाचें ध्येयवाक्य होतें. आजही आपल्या भारताचे सर्व मंत्री व उपमंत्री, सरकारी अधिकारी, सरकारी नोकर, तसेंच खाजगी संस्थांचे अधिकारी-नोकर या सर्वांनीं जनतेचीं गाऱ्हाणीं ऐकून घेऊन तीं दूर केलीं पाहिजेत. यामुळें सर्वांचे सर्व व्यवहार सुरळीत चालतील. कोणीहीं आपल्याबद्दल गाऱ्हाणीं सांगितल्यास तीं दूर करणें, प्रत्येकाचें कर्तव्य आहे. हाच बोध या राजाज्ञेवरून घ्यावा.

## अशोकाची सातवी राजाज्ञा

**पाली—**देवानं प्रियो प्रियदसि राजा सर्वत इच्छति-सवे पासंडा वसेयु । सवे ते संयमं च भावसुधिं च इच्छान्ति । जनो तु उछा वच छंदो उछावचरागो । त सर्वं व कासंति एकदेसं व कासंति । विपुले तुऽपि दाने यस नास्ति संयमे भावसुधिता व कतंञता या दढमतिता च निचे बाढं ।

### प्रथम संयम पाळा, चित्तशुद्धि ठेवा व नंतरच दानधर्म करा

**देवानांप्रिय प्रियदर्शी राजा असें इच्छितो कीं सर्व पंथांच्या लोकांनीं त्याच्या राज्यांत राहावें. सर्वजण संयम आणि चित्तशुद्धि असावी हें इच्छितात. जनतेच्या मनाचा कल व श्रद्धा नाना तऱ्हेची असते. ती जनता सर्व कर्म करील किंवा कर्माचा एक भाग करील. ज्याला संयम नाहीं, चित्तशुद्धि नाहीं आणि कृतज्ञता नाहीं त्यानें विपुल दानधर्म केला, धर्मश्रद्धा दाखविली, तरी त्याला कांहीं किंमत नाहीं.**

**स्पष्टीकरणः**—सचोटी, हातोटी, चिकाटी, लिखोटी ( हिशोब ) हीं धंद्यांतील चार सूत्रें पाळून, उद्योगधंद्यांत किंवा आपल्या पेशांत शंभर नंबरी नीतीनें वागून संपत्ति मिळविणारे व दानधर्म करणारे लोक सोडल्यास समाजामधील निरनिराळ्या पेशांतील श्रीमंतांपैकीं कांहीं लहान-मोठ्या व्यक्ती,

तसेंच गरिबांपैकीं कांहीं लहान-मोठ्या व्यक्ती पैशासाठीं पापकृत्यें करून अनीतीनें खूप पैसा मिळवितात आणि श्रीमंत होतात. नंतर त्यांच्या मनांत नेहमीं असा विचार येत असतो कीं, आपण लांड्यालबाडया करून, लोकांना फसवून, अनीतीच्या वर्तनानें हे पैसे मिळविले आहेत. तसेंच खून परस्त्रीगमनादि केलें, हें आपण पाप केलें आहे. अनीतीच्या पैशापैकीं देवाच्या नांवानें शेंकडा दहावीस टक्के दानधर्म केला, तर आपण पातकांतून मुक्त होऊं म्हणून ते सार्वजनिक संस्थांना किंवा सामाजिक सत्कृत्याला देणग्या देतात व धर्मकार्यांत, समाजकार्यांत, व राजकारणांत शिरतात. हा त्यांचा दानधर्म म्हणजे पूर्वायुष्य पातकांत घालवून स्वतःची, धर्माची व समाजाची फसवणूक करणारा असा आहे. तसाच तो अराष्ट्रीय आणि स्वतःला व समाजाला अधोगतीला नेणारा आहे. अशा व्यक्तींच्या देणग्या घेणें, हेंही पातक आहे. ह्या कुकृत्याची जाणीव समाजसुधारकांनीं, साधुसंतांनीं व पुढाऱ्यांनीं समाजाला वारंवार करून दिली तर अनीतिमूलक दानधर्माची चाल कायमची बंद पडून, नीतिमूलक, शुद्ध दानधर्माची चाल समाजांत राहील. सम्राट् अशोकानें, संयम व मनाची शुद्धि राखून नंतरच व्यक्तीनें शुद्ध दानधर्म करावा, हा दंडक या राजाज्ञेंत घालून दिला आहे; त्याचा आचार आज समाजानें काटेकोरपणानेंच केला पाहिजे.

## अशोकाची आठवी राजाज्ञा

**पाली**—अतिकातं अंतरं राजानो विहारयातं आयासु। एत मगव्या अञानि च एतारिसानि अभिरामकानि अहुंसु। सो देवानं पियो पियदसि राजा दसवसाभिसितो संतो अयाय संबोधि। तेनेसा धंमयाता। एतायं होति ब्राह्मणसमणानं दसणे च दाने च थइरानं दसणे च हिरणपटिविधाने च जनपदस च जनस दसनं, धंमानुसस्टि, च धंमपरिपुछा च। तदोपाया एसा भुय रति देवानं प्रियस प्रियदसिनो राञो भागे अञे।

## अशोकाला धर्मयात्रेंत जनतारूपी जनार्दनाच्या भेटीचा आनंद मिळाला

**फार पूर्वींपासून राजे लोक विहार यात्रेस ( करमणुकीच्या सहलीसाठीं ) जात होते. शिकार साधणें, करमणूक साधणें, ह्या गोष्टी**

**होत असत. आतां देवानां प्रिय प्रियदर्शी राजा बोधि वृक्षाच्या यात्रेला गेला होता. (भगवान् बुद्धाला ज्या बोधिवृक्षाखालीं जगाच्या उद्धाराचें ज्ञान झालें, बोध झाला, त्या बुद्धगया येथील पवित्र ठिकाणाचें दर्शना-साठीं सम्राट् अशोकानें सहल काढली होती.) तेव्हांपासून धर्मयात्रा चालू झाल्या. ह्या धर्मयात्रेंत ब्राह्मणांचें व श्रमणांचें दर्शन घडतें, त्यांना दानधर्म केला जातो. थोर वृद्धांचें दर्शन घडतें, त्यांना धन दिलें जातें. जनतेच्या भेटीचा योग येतो. त्यांची चौकशी, त्यांच्याशीं धर्मचर्चा करण्याची संधि मिळते. देवानां प्रिय प्रियदर्शी राजाचें हें मोठें भाग्य होय, कीं त्याला ह्या धर्मयात्रेमुळें आनंद मिळतो.**

**स्पष्टीकरण**—पूर्वी राजेरजवाडे, सरदार आणि श्रीमंत लोक, केवळ आपल्या चैनीसाठीं नायकिणींना बरोबर घेऊन, सहलीला जात असत, तसेंच शिकारीला जात असत व याप्रीत्यर्थ खूप पैसा खर्च करीत असत. ह्या चालींत सम्राट् अशोकाला आपल्या प्रजेची सेवा घडत नाहीं, व स्वार्था-साठीं अनाठायीं विनाकरण खूप पैसा खर्च होतो, हें कळलें. हें बरोबर नाहीं, असें त्याला वाटल्यामुळें त्यानें धर्मयात्रा चालू केली. त्यांत जनतेचें दर्शन घडल्यामुळें अशोकाला जनतेच्या सोयीगैरसोयींची सर्व कल्पना येत होती. सुधारणा कशी करावी हेंही अशोकाला कळूं लागलें होतें. हल्लींहि मंत्री, उपमंत्री, आमदार, खासदार, अधिकारी, यांनीं निरनिराळ्या त्या त्या पंथाच्या सार्वजनिक-धार्मिक उत्सवांत, सामाजिक कार्यक्रमांत, भाग घेऊन, समरस व्हावें, म्हणजे त्यांना जनतारूपी जनार्दनाचें खरें दर्शन घडेल आणि जनतेच्या हितासाठीं निवडलेल्या आपणांस जनतेची सेवा करण्याची व त्यांचीं गाऱ्हाणीं ऐकण्याची व तीं दूर करण्याची संधि मिळेल, हा बोध या राजाज्ञेवरून सर्वांना घेतां येईल.

## अशोकाची नववी राजाज्ञा

**पाली**-देवानं पियो प्रियदसि राजा एवं आह—अस्ति जनो उचावचं मंगल करोते; आबाधेसु वा आवाह विवाहेसु वा पुत्रलाभेसु वा प्रवासम्हि वा। एतम्हि च अञम्हि च जनो उचावचं मंगलं करोते। एत तु महिडायो बहुकं च बहुविधं च छुदं च निरथं च मंगलं करोते। त कतव्यमेव मंगलं। अपफलं तु खो

एतारिसं मंगलं । अयं तु महाफले मंगले य धंममंगले । तत दासभातकम्हि सम्य-प्रतिपत्ति, गरूनं अपिचिति साधु पाणेसु संयमो ।

साधु बह्मणसमणानं साधु दानं । एत च अञं च एतारिसं धंममंगलं नाम । स वतव्यं पिता वा पुतेन या भाञा वा स्वामिकेन वा इदं साधु, इदं कतव्यं मंगलं आव तस निस्टानाय । अस्ति चपि वुतं-साधु दानं इति । न तु एतारिस अस्ति दानं, व अनुगहो व यारिसं धंमदानं व धंमानुगहो व । त तु खो मित्रेन व सुहदायेन या ञातिकेन व सहायेन व ओवादितव्यं तम्हि तम्हि प्रकरणे इदं कचं, इदं साधु इति, इमिना सकं स्वगं आराधेतु इति किं च इमिना कतव्यतरं यथा स्वगारधि ।

## लग्नकार्यांत, मुलांच्या बारशाच्या वेळीं क्षुल्लक निरर्थक गोष्टी जनतेनें करूं नयेत; मुख्य " धर्म मंगल विधि "करावा

**देवानांप्रिय प्रियदर्शी राजा असें म्हणाला कीं, आजारीपणांत, मुलामुलींच्या लग्नाच्या वेळीं, मुलांच्या बारशाच्या वेळीं, किंवा प्रवासांत यात्रेत, जनता लहानमोठे मंगलविधि करते. या वेळीं बायका अनेक प्रकारच्या क्षुल्लक निरर्थक गोष्टी, मंगलविधीच्या नांवाखालीं करतात. परंतु अशा मंगलविधीमध्यें समावेश न होणाऱ्या गोष्टी ह्या फलप्राप्ति देत नाहींत. फलप्राप्ति देणारा तो मंगलविधि होय. दास-नोकर, यांच्यांशीं चांगली वागणूक, गुरुजन-श्रेष्ठ व्यक्ति यांच्याबद्दल आदरभाव, प्राणिमात्राबद्दल संयमी, चांगलें वर्तन, ब्राह्मण व श्रमण यांना दान देणें, ह्या गोष्टी व अशाच तऱ्हेचें दुसरें सत्कृत्य, हें धर्ममंगल होय. बाप, मुलगा, भाऊ, मालक, यांनीं " हें कृत्य चांगलें आहे, मंगलकारक आहे " कार्यसिद्धि होईपर्यंत धर्ममंगल कृत्य केलें पाहिजे, पुनः पुनः मी तें करीन, असें म्हटलें पाहिजे. दान देणें चांगलें आहे, असें म्हटलें जातें; परंतु धर्मदान, धर्मानुग्रह, यांच्याशीं तुलना करण्यासारखें दुसरें दान नाहीं. मित्र, नातेवाईक, साहाय्यकर्ते, यांनीं त्या त्या प्रकरणांत " हें कृत्य चांगलें आहे, ह्या कृत्यानें स्वर्गप्राप्ति होते. स्वर्गप्राप्तीपेक्षा दुसरी कोणती श्रेष्ठ गोष्ट मिळविण्यासारखी नाहीं. " असें म्हटलें पाहिजे.**

**स्पष्टीकरण**—अशोकाच्या वेळीं धर्मविधींत समावेश न होणाऱ्या फालतू अनेक गोष्टी धर्मविधि म्हणून स्त्रीपुरुष करीत होते. त्या गोष्टींमुळें

कांहीं फलप्राप्ति होत नव्हती. असे विधि करूं नयेत, हें अशोकानें सांगितलें. यक्ष, गंधर्व, किन्नर, नाग, वगैरेंची मर्जी सांभाळण्यासाठीं लग्न, बारसें, या वेळीं त्यांचे स्तोत्रपाठ, त्यांना नवस करणें, त्यांना उद्देशून कोंबडीं, बकरीं टोणगे मारणें हे प्रकार धर्मविधि म्हणून त्या वेळचा समाज करीत होता. नायकिणींचा नाच, तमाशे, वगैरेसाठींही समाज ऐपतीबाहेर नेहमीं पैसा खर्च करीत होता. यामुळें कित्येक लोक कर्जबाजारी होत असत. आजही लग्नादि प्रसंगीं बॅन्ड, बत्त्या, मोटारी फुलांनीं सजविणें, जलसे, पशु मारणें, वगैरे कृत्यें, ह्या गोष्टी धर्म म्हणून चालू आहेत. त्या कायमच्या बंद होणें अत्यावश्यक आहे.

## अशोकाची दहावी राजाज्ञा

**पाली**—देवानं प्रियो प्रियदसिराजा यसो वा कीति वा न महाथावहा मञते, अञत तदात्पनो दीघाय च मे जनो धंमसुस्रसा सुस्रसतं संमवुतं च अनुविधियतं । एतकाय देवानं पियो पियदसि राजा यसो वा कीति पा इच्छति । यं तु किं चि पराकमते देवानं प्रियदसिराजा त सवं पारत्रिकाय; किं ति सकले अपपरिस्रवे अस । एस तु परिस्रवे य अपुञं । दुकरं तु खो एतं छुदकेन व जनेन वुसटेन व अञ अगेन पराकमेन सवं परिचजित्वा । एत तु खो वुसटेन दुकरं ।

## सर्व लोकांनीं आपल्या ठिकाणच्या पापरूपी शत्रूपासून मुक्तता करून घ्यावी

**देवानां प्रिय प्रियदर्शी राजाला यश व कीर्ति यांत विशेष वाटत नाहीं. माझी जनता दीर्घकाळ धर्म ऐकणारी, धर्माचरण करणारी व्हावी. यासाठीं देवानां प्रिय प्रियदर्शी राजाला यश व कीर्ति मिळवावी असें वाटतें. तो जे श्रम घेतो, ते सर्व परलोकाकरतां आहेत असें कां? सर्व लोक पापरहित असावेत; पापरूपी शत्रूपासून सुटका व्हावी. ही गोष्ट लहान व मोठ्या व्यक्तींना पराक्रमाशिवाय साधणें कठीण.**

## अशोकाची अकरावी राजाज्ञा

**पाली**—देवानं प्रियो प्रियदसिराजा एवं आह—नास्ति एतारिसं दानं यारिसं धमदानं, धंमसंस्तवो, वा धंमसंविभागो व धंमसंबंधो व । तत इदं भवति

दासभतकम्हि सम्यप्रतिपति, मातरि पितरि साधु सुस्रुसा, मितसंस्तुतञातिकानं ब्राह्मणसमंणानं साधु दानं, प्राणानं अनारंभो साधु । एत वतव्यं पिता व पुत्रेन व माता व मितसंस्तुतञातिकेन व आव पठिविसियेहि—इदं साधु इदं कर्तव्यं । सो तथा करु । इहलोक चस आराधो होति, परत च अनंतं पुञं भवति तेन धंमदानेन ।

## धर्मदानासारखें दुसरें दान नाहीं

**देवानां प्रिय प्रियदर्शी राजा असें म्हणाला कीं – १ धर्मदानासारखें दुसरें दान नाहीं. २ धर्मपरिचयासारखा दुसरा परिचय नाहीं. ३ धर्मविभागासारखा दुसरा विभाग नाहीं. आणि ४ धर्मसंबंधासारखा दुसरा संबंध नाहीं. धर्मांत पुढील गोष्टी येतात—१ दास व नोकर, यांना चांगली वागणूक देणें. २ मातापितरांची चांगली सेवा करणें. ३ मित्र, नातेवाईक, ब्राह्मण, श्रमण यांना चांगलें दान देणें. त्यांना निरनिराळी मदत करणें, प्राणिमात्रांचा वध न करणें. बाप, मुलगा, भाऊ, मित्र, नातेवाईक, शेजारी यांनीं म्हटलें पाहिजे कीं हें काम चांगलें. यानें इहलोकाची आराधना होते व ह्या दानानें परलोकीं व इहलोकीं अनंत पुण्य लाभतें.**

**स्पष्टीकरण** [ १ ] **धर्मदान**—धर्म म्हणजे कर्तव्यें. **१ मातृधर्म**-मुलांचें संगोपन, मनापासून शंभर नंबरी उत्कृष्ट संसार करणें, **२ पितृधर्म, ३ पुत्रधर्म, ४ पतिधर्म, ५ पत्नीधर्म, ६ गुरुधर्म, ७ शिष्यधर्म, ८ स्वामीधर्म, ९ सेवकधर्म, १० राजधर्म, ११ राजसेवकधर्म** वगैरे त्या त्या अवस्थेंतील व्यक्तिधर्म यांचें शिक्षण देणें, हें सर्व दानांत श्रेष्ठ दान होय. [ **२** ] **धर्मपरिचय**—धर्मपरिचयानें एकमेकांबद्दल प्रेम, मैत्री, आदर वाढतो. **[ ३ ] धर्मसंबंध**—पितापुत्रसंबंध—पित्यानें आपल्या मुलासंबंधीं सर्व जबाबदारी पार पाडणें, त्याला विद्या देणें, स्वावलंबी, पापभीरु, सद्गुणी बनविणें, हा धर्मसंबंध होय. पुत्रानें पितृकर्तव्यें पार पाडणें, हा पुत्राचा धर्मसंबंध आहे.

## अशोकाची बारावी राजाज्ञा

**पाली**—देवानं प्रियो पियदासिराजा सवपासंडानि च पवजितानि च घरस्तानि च पूजयति दानेन च विविधाय पूजाय पूजयति ने । न तु तथा दानं व पूजा व

देवानं पियो मञते, यथा किंऽति सारवढि अस सवपासंडानं । सारवढि तु बहु-विधा । तस तु इदं मूलं य वचिगुति, किंऽति अत्पपासंडपूजा व परपासंडगरहा व नो भवे । अपकरणम्हि लहुका व अस, तम्हि तम्हि पकरणे । पूजेतव्या तु एव परपासंडा तेन तेन पकरणेन । एवं करुं आत्पपासंडं च वढयति, परपासंडस च उपकरोति । तदंञथा करोतो आत्पपासंडं छपति, परपासंडस चपि अपकरोति । यो हि कोचि आत्प पासंडं पूजयति, परपासंडं वा गरहति सवं आत्पपासंडमतिया किं ति आत्पपासंडं दीपयेम इति, सोच पुन तथ करोतो आत्पपासंडं बहुतरं उपहनाति । त समवायो एव साधु, किंति अंञमंञस धम्मं सुणारु च सुसुसेरु च । एवं हि देवानं पियस इच्छा, किं ति सवपासंडा बहुस्रुता च असु कलाणागमा च असु । ये च तत्र तत्र प्रसंना तेहि वतव्यं-देवानं प्रियो न तथा दानं व पूजा व मञते, यथा किंऽति सारवढि अस सर्वपासंडानं । बहुका च एताय अथाय व्यापता धंममहामाता च इथिधियखमहामाता च वचभूमिका च अञे च निकाया । अयं च एतस फलं य आत्प-पासंडवढि च होति, धमस च दीपना ।

**अशोक राजा सर्व धर्मपंथांतील खऱ्या साधुसंतांना व आदर्श गृहस्थांना देणग्या देऊन, त्यांचा आदरसत्कार करतो. त्यांनीं चांगल्या धर्मतत्त्वांची वाढ करावी, त्यांनीं आपल्या धर्मपंथांचीच फक्त स्तुती व परमधर्मपंथानिंदा करूं नये. सर्व धर्मपंथांचा मेळावा करणें चांगलें आहे.**

देवानां प्रिय प्रियदर्शी राजा सर्व धर्मपंथांतील प्रव्रजित, साधुसंत, आदर्श धार्मिक गृहस्थ, यांना दानें, देणग्या किंवा वतनें देऊन त्यांचा आदरसत्कार करतो. देवानां प्रिय राजाला फक्त दानें देणें, आदरसत्कार करणें हें प्रिय नाहीं, तर सर्व धर्मांतील चांगल्या तत्त्वाची वाढ होणें, हें प्रिय आहे. तत्त्वाची वाढ अनेक प्रकारची आहे. वाक्संयम हें मूलतत्त्व आहे. फक्त आपल्या धर्मपंथाचीच स्तुति, गौरव व आदर करणें आणि परधर्मपंथांची निंदा करणें, हें घडूं नये. त्या त्या चांगल्या बाबतींत त्या त्या वेळीं, त्या त्या प्रकरणीं, परधर्मपंथाची स्तुति करावी. असें केलें असतां आपल्या धर्मपंथाची वाढ होते व परधर्मपंथाचाही फायदा होतो. याच्या उलट माणूस वागल्यास आपल्या धर्मपंथाची हानि व परधर्मपंथाचें

**नुकसान तो माणूस करतो. जो कोणी माणूस आपल्या धर्मपंथाच्या भरभराटीसाठीं फक्त आपल्या धर्मपंथाचीच स्तुति करतो व परधर्माची निंदा करतो तसें करणारा तो माणूस आपल्या धर्मपंथाची फार मोठी हानि करतो. त्यापेक्षां धर्मपंथांचा एकत्र मेळावा भरविणें चांगलें आहे.**

**त्या धर्ममेळाव्यांत एकमेकांचें धर्मतत्त्व, आचारविचार, लोक ऐकतील व चांगल्या गोष्टी घेतील, अशी देवानां प्रिय प्रियदर्शी राजाची इच्छा आहे. यामुळें प्रत्येक धर्मपंथाचे लोक बहुश्रुत होतील व आपलें कल्याण साधणारे होतील. जे लोक त्या त्या धर्मांत प्रसन्न असे आहेत त्यांनीं असें मनांत ठवावें कीं, देवानां प्रिय प्रियदर्शी राजाला फक्त त्या त्या धर्मांतील साधुसंतांना दानधर्म करणें, त्यांचा आदरसत्कार करणें प्रिय नसून त्या सर्व धर्मांतील उत्कृष्ट तत्त्वाची वाढ व्हावी व एकमेकांविषयीं आदर असावा हें वाटतें. या गोष्टीसाठीं अनेक धर्ममहामात्र पुरुष व धर्ममहामात्रा स्त्री, व्रात्यभूमिक, इतर अधिकारी, यांची नेमणूक केली आहे.**

**स्पष्टीकरण**—सम्राट् अशोकाच्या काळीं हिंदुस्थानांत अनेक धर्म होते. ते ते धर्मपंथी लोक आत्मधर्मपंथाची स्तुति व परधर्माची निंदा करीत असत. त्यामुळें एकोपा न राहतां भांडणें, जातिभेद, उग्र स्वरूपाला गेले होते. त्यामुळें नेहमीं भारतांत धर्मकलह, जातिकलह आणि द्रव्यकलह सारखे चालू होते. ते बंद केल्याशिवाय समाज सुधारणार नाहीं हें अशोकानें ओळखलें. त्यासाठीं धर्ममहामात्र नेमून, समाजांतील सर्व प्रकारचे कलह मिटाविण्याचा स्तुत्य प्रयत्न अशोकानें केला. त्याचें आम्हीं चालू काळीं जर अनुकरण करूं तर भांडणाचे अनेक प्रश्न सुटतील व माणसांत नेहमीं ऐक्य नांदेल. नंतर सर्व धर्मगुरूंना मानवता धर्म वाढवितां येईल.

## अशोकाची तेरावी राजाज्ञा

**पाली**—अस्टवसाभिसितस देवानं प्रियस प्रियदासिस राञो कालिंगा विजिता। दियढमत्रे प्राणसतसहस्रे ये ततो अपबुढे सहस्रमत्रे तत्र हते। बहु तावतके मुटे। ततो पछा अधुना लधेसु कलिंगेसु तित्र धंमपालनं, धंमकामता, धंमानुसास्टि च देवानं प्रियस। पुत्रा, पुपोत्रा मे धंमविजये विजयं मजंतु। सो हिदलोकिको परलोकिको।

**राज्याभिषेकाच्या नंतर आठव्या वर्षीं देवानां प्रिय प्रियदर्शी राजानें कलिंग देश जिंकला. तेव्हां दीड लाख लोक कैद केले व एक लाख**

**लोक ठार मारले. तसेंच अनेक लोक मेले. कलिंग देश मिळाल्यावर देवानां प्रिय राजा अधिक प्रमाणांत धर्मपालन करूं लागला. त्याला अधिक धर्मप्रेम जडलें आणि धर्मप्रसार तो अधिक करूं लागला. माझ्या मुलांनीं, नातेवाइकांनीं धर्मविजय हाच खरा विजय मानावा. तो विजय इहलोकीं व परलोकीं असतो.**

**स्पष्टीकरण**—सम्राट् अशोकाला कलिंग देशावरील युद्धामध्यें लक्षावधि लोकांची हत्या झाली, अनेक घरांचा नाश झाला, देशाची हानि झाली, हें पाहून फार वाईट वाटलें. तेव्हां त्यानें शक्य तों युद्ध टाळावें; परंतु युद्धच करण्याचा प्रसंग आला तर मोठ्या संयमानें, युक्तीनें हानी कमी होईल इकडे लक्ष द्यावें, हा संदेश पुढील पिढीला दिला आहे. "धर्मविजय आणि धर्मप्रसार, हाच खरा विजय आहे" हें ध्येयवाक्य समाजापुढें ठेविलें आहे. दुसऱ्या महायुद्धांत ज्या युरोपियन राष्ट्रांनीं भाग घेतला, तेथील जनतेंतून १९ ते ४५ वर्षांचे लोकांनीं आपल्या राष्ट्राच्या रक्षणासाठीं भाग घेतला होता. त्या वेळीं बहुसंख्य लोक युद्धांत मेले. बायका, म्हातारे, कांहीं तरुण लोक व लहान मुलें, जिवंत राहिलीं. देशाची खूप हानी झाली. हें सर्व पाहून, तेथील जनतेनें युद्ध नको हीच घोषणा नंतर केली; भारताचे पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू, जेव्हां जेव्हां परदेशांत गेले, तेव्हां त्यांनीं तेथील जनतेपुढें "माणसानें माणसाशीं माणुसकीनें वागावें" हा भारताचा "**मानवताधर्म**" जगाला तारील याचाच प्रचार केला आहे. त्यामुळें भारत देश शांतताप्रिय आहे याची जगाला खात्री पटली.

## अशोकाची चौदावी राजाज्ञा

**पाली**—अयं धंमलिपि देवानं प्रियेन प्रियदसिना राजा लेखापिता । अस्ति एव संखितेन अस्ति, मझमेन अस्ति, विस्ततेन, न च सर्वं सर्वत घटितं । अस्ति च अत्र पुन पुन वुत तस तस अथस मधुरताय किंति जनो तथा पटिपजयेथ ।

**हे धर्मलेख देवानां प्रिय प्रियदर्शी राजानें लिहून घेतले आहेत. त्यांत कांहीं लेख संक्षेपानें, कांहीं लेख मध्यम प्रमाणांत आहेत. तसेंच कांहीं लेख विस्तारानें आहेत. बऱ्याच गोष्टी व विषय अत्यंत मधुर**

**असल्यानें वारंवार सांगण्यांत आल्या आहेत. लोकांनीं त्याप्रमाणें आचरण करावें हा उद्देश आहे.**

**स्पष्टीकरण**—सम्राट् अशोकाला राज्य चालवीत असतांना राज्यकारभारांत व जनतेंत जे कांहीं दोष दिसले, त्यामुळें राजकीय, सामाजिक, धार्मिक बाबतींत जी कांहीं पछेहाट दिसली, ती सुधारण्यासाठीं व सर्व राज्यकारभार अत्यंत उच्च नीतिनियमांनीं चालावा यासाठीं तेरा राजाज्ञांत महत्त्वपूर्ण धर्माचा उत्कृष्ट उपदेश त्यानें केला आहे. त्याचा विचार, त्याचा उच्चार व त्यांचा आचार, जनतेनें जनतेच्या हितासाठीं निवडून दिलेल्या सर्व मंत्रिवर्गानें, सर्व खासदारांनीं, सर्व आमदारांनीं, तसेंच सर्व सरकारी सेवकवर्गानें व बहुजनसमाजानें केल्यास सर्वांचें कल्याण होईल. तशी सद्बुद्धि भारतमाता सर्व भारतीयांना देवो व भारताच्या मानवताधर्माचा जयजयकार सर्वत्र होवो, हीच भारतमातेला वंदनपूर्वक प्रार्थना आहे.

## स्तंभलेख

**स्तंभलेख १**—देवानां प्रिय प्रियदर्शी राजाचें असें म्हणणें आहे कीं उत्कट धर्मप्रेम, उत्कट आत्मपरीक्षण, उत्कट आज्ञाधारकपणा, उत्कट पापभीरुता, उत्कट उल्हास, हे गुण अंगीं असल्यावांचून इहलोकीं आणि परलोकीं आपली उन्नति करणें कठीण आहे.

माझे जिल्हाधिकारी मग ते वरच्या दर्जाचे, मध्यम दर्जाचे, खालच्या दर्जाचे असोत ते धर्मबुद्धीनें ( कर्तव्य, नीति, सदाचार ) वागतील, प्रजेला उत्तेजन देण्यास समर्थ होतील.

**स्तंभलेख २**—देवानां प्रिय प्रियदर्शी राजाचें असें म्हणणें आहे कीं—निष्पापता, सत्कर्म, दया, दान ( मदत ) सत्य आणि पावित्र्य या गोष्टींत धर्म आहे.

**स्तंभलेख ३**—माणसाला त्याची वाईट गोष्ट लक्षांत येत नाहीं. तरीमुद्धां त्यानें पुढील गोष्ट लक्षांत ठेवावी कीं, मद, निष्ठुरता, क्रोध, दंभ, मत्सर या विकारांमुळें माणसाच्या हातून पापें घडतात. मी या विकारांपायीं माझें अधःपतन होऊं देणार नाहीं.

**स्तंभलेख ४**–सरकारी अधिकारी वर्गानें आपलीं कामें नेहमीं निःस्वार्थीपणानें आणि निर्भयतेनें करावींत व जनतेला सुखी व समृद्ध करून लोकहित साधावें म्हणून मी त्यांची नेमणूक केली आहे.

ज्याप्रमाणें एखाद्या माणसानें आपलें लहान बालक हुशार दाईच्या ताब्यांत दिल्यावर त्याला विश्वास वाटतो आणि तो आपल्याशीं असें म्हणतो कीं, “ ही हुशार दाई माझ्या लहान बालकाचा सांभाळ उत्तम करील ” त्याप्रमाणेंच माझ्या प्रजेनें नेहमीं सुखी, आनंदी, दुःखरहित व्हावें म्हणून मी या राजुकांची नेमणूक केली आहे.

**तात्पर्य**—सरकारी नोकरांनीं नेहमीं प्रजासेवा हेंच मुख्य कर्तव्य शुद्धपणें केलें पाहिजे.

## पहिला कालिंग लेख

माणसांत द्वेष, चंचलता, निष्ठुरता, अस्थिरता, आळस आणि ऐदीपणा ( काम न करतां फुकटांत खाणें ) हे दुर्गुण असतील तर त्याच्या हातून योग्य वर्तन होणार नाहीं. म्हणून या दुर्गुणांचा संपर्क नसावा.

## राष्ट्रपिते महात्मा गांधी यांचा संदेश

**महात्मा गांधी**–हिटलर, मुसोलिनी व स्टॅलिन यांनीं हिंसेचा तात्कालिक प्रभाव सिद्ध केला आहे. पण चंगीजखानाच्या कत्तलीइतका तो अल्पजीवी आहे. आशियाजवळ सर्व जगाला देण्यासाठीं **मानवताधर्म** हा संदेश आहे. मात्र त्यानें स्वतः त्याचें आचरण करावें. भारत, चीन, जपान, ब्रह्मदेश, सिलोन, मलाया आदि सर्व आशियाई देशांत भारतीय बौद्ध धर्माच्या मानवताधर्माचा प्रभाव पडलेला आहे. त्या धर्माचें ज्ञान आंशियानें पुनः स्वतः शिकून नंतर जगाला शिकविलें पाहिजे. ( हरिजन १९४७ ).

---

प्रकाशक—**पंडित नारायण वासुदेव तुंगार**, ४०८ नारायण पेठ, पुणें २.
मुद्रक—**भ. पं. सोभण**, मॉडर्न प्रिंटिंग प्रेस, ३९१ नारायण पेठ, पुणें २.

**भारतरत्न, महर्षि, डॉ. धोंडो केशव कर्वे, यांचा शुभ आशीर्वाद**

अशोकचक्र हें भारताचें राज्यचिन्ह आहे. त्यासंबंधीं माहिती व सम्राट् अशोकानें आपल्या प्रजेला सांगितलेला नीतिधर्म, यांची मांडणी या पुस्तकांत श्री. तुंगारांनीं चांगल्या रीतीनें केली आहे. ती विद्यार्थिवर्गाला व प्रौढ स्त्रीपुरुषांना कळणें आवश्यक आहे. या पुस्तकाला व श्री. तुंगारांच्या अशोकविषयक व्याख्यानयज्ञाला माझा शुभ-आशीर्वाद आहे.

७।२।१९५८ **धों. के. कर्वे**

**मुंबई प्रांताचे मुख्य मंत्री नामदार यशवंतराव चव्हाण यांची शुभेच्छा**

सचिवालय, मुंबई १.
दिनांक २४।२।१९५८

अशोकाचा राजधर्म, हें आपलें पुस्तक मी वाचलें. सम्राट् अशोकाच्या चौदा महत्त्वाच्या राजाज्ञा एकत्रित करून, त्यांचा अर्थ बोधपूर्ण व सोप्या भाषेंत समजावून देण्याचा प्रयत्न या पुस्तकांत करण्यांत आला आहे. हा अर्थ समजावून सांगतांना भारतांतील संत व विचारवंत यांच्या उद्गारांचा उल्लेखही या पुस्तकांत केला आहे. त्यामुळें हे पुस्तक वाचतांना जीवन-विषयक भारतीय दृष्टिकोनाचें ओझरतें दर्शनही घडतें. एकंदरींत सामान्य वाचकांना हें पुस्तक उपयुक्त वाटेल यांत शंका नाहीं. आपल्या प्रकाशनास माझ्या शुभेच्छा. **यशवंतराव चव्हाण**

**पद्मभूषण कर्मवीर भाऊराव पाटील, रयत सेवक, ससून सी ३ वॉर्ड, पुणें**

"अशोक राजधर्म" आजच्या काळांतहि जनतेनें व सरकारनें आत्मसात् करावा याच हेतूनें प्रसिद्ध केलेलें पुस्तक आपली मनीषा पूर्ण करील. मूळ पाली-प्राकृत आज्ञा, त्यांचें सुरस—सुलभ भाषांतर सर्वसाधारण मनुष्यास सहज समजूं शकेल. प्रत्येक हिंदी माणसानें हें पुस्तक जवळ ठेवून त्याचें वाचन व मनन केल्यास त्याचें कल्याण होईल.

२४-४-५९ **भाऊ पाटील**

---

हें पुस्तक डबल डेमी, ३६ पौंडी हिंदुस्तानांत तयार झालेल्या व्हाइट प्रिंटिंग कागदावर छापलें आहे.

# पंडित नारायण वासुदेव तुंगार यांचीं पुस्तकें

**१. महाराष्ट्रवन्दनम्**—लघुकाव्य. ४२ श्लोक. मूळ संस्कृत व त्याचा मराठी पद्यानुवाद. महाराष्ट्र सरकारचें शिक्षणखातें, समाजकल्याणखातें, शेतकी खातें, पशुसंवर्धन खातें, तुरुंगखातें, यांनीं आपल्या शिक्षणसंस्थांच्या वाचनालयांसाठीं प्रती घेऊन प्रोत्साहन दिलें आहे. त्याचप्रमाणें शेंकडो खाजगी प्राथमिक शाळा, हायस्कुलें, ट्रेनिंग कॉलेजें, इतर सर्व प्रकारचीं कॉलेजें, यांनीं प्रती घेऊन प्रोत्साहन दिलें आहे. रोजच्या प्रार्थनेसाठीं या काव्यांतील १ ते १५ श्लोक म्हणण्याचा अनेक शिक्षणसंस्थांनीं स्तुत्य उपक्रम केला आहे. १५ ऑगस्ट—स्वातंत्र्य दिन. २६ जानेवारी—प्रजासत्ताक दिन, १ मे—महाराष्ट्र राज्य स्थापना दिन, थोरांच्या जयंत्या, या शुभ प्रसंगींही प्रार्थनेकरितां या लघुकाव्याचा उपयोग जनता करीत आहे. १/२ डेमी साईज, पृष्ठें १२, सचित्र. किं. २५ नये पैसे. उत्तम कव्हर.

## — प्रसिद्धीच्या वाटेवर —

**२. महाराष्ट्रवन्दनम्**—महाकाव्य—मूळ सोपें संस्कृत व त्याचा मराठी पद्यानुवाद, श्लोक ५००, पंडित चिन्नाबशास्त्री, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, महामहोपाध्याय द. वा. पोतदार, सर डॉ. भवानीशंकर नियोगी. नागपूर: न्यायमूर्ती बडकस, उपकुलगुरु, नागपूर विद्यापीठ: प्रि. कर्वे, उपकुलगुरु पुणें विद्यापीठ: नामदार पागे, नामदार यशवंतराव चव्हाण, डॉ. खेडकर, अध्यक्ष महाराष्ट्र कॉंग्रेस, डॉ. आर. एन. दांडेकर, महामहोपाध्याय कस्तुरेशास्त्री, नांदेड वगैरे नामवंत विद्वानांनीं उत्तम अभिप्राय देऊन गौरविलेलें.

**विषय**—महाराष्ट्रांतील, देवतां, नद्या, गड, लेणीं, संस्थानांचे आद्य पुरुष, राजकीय, सामाजिक, धार्मिक, क्षेत्रांतील विद्वान् ग्रंथकार, नाटककार, गवई, कलावंत, उद्योगपति, विद्यापीठें, संस्था, यांच्या वर्णनांसह त्यांना वंदन. सचित्र ग्रंथ.

श्रीतुंगारेण कविना रचितं यन्मनोहरम् ।
गायन्तु लोकास्तन्नित्यं महाराष्ट्राभिवन्दनम् ॥

कवि—प्रा. श्री. भा. वर्णेकर, एम. ए. संस्कृताध्यापक, नागपूर विद्यापीठ

**३. संतांचें विचारसौंदर्य**—निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई, एकनाथ, नामदेव, वगैरे अनेक संतांचे नीतिपर, उपदेशपर, समाधानकारक अभंगसंग्रह.